# भयंकर सूड !

—XS*SX—

( एडवर्ड यंगकृत " रिव्हेंज " याचे आधारें )

द० भा० जयवंत यांनीं लिहिलें

तें

उमरावती येथें प्रमोदसिंधु छापखान्यांत छापिलें.



सन १८९४.

किंमत ६ आणे.

टीपः—पुस्तकें उमरावती [ वऱ्हाड ] येथें

प्रमोदसिंधु छापखान्यांत

मिळतील.

# प्रस्तावना.




—×**×—

यांतील संविधानक पाहून वाचकांस महाकवि शेक्सपियरच्या ऑथेल्लोचें स्मरण होईल आणि कदाचित् एखाद्याकडून गैर समजानें मजवरच दोषारोपण केलें जाईल म्हणून थोडासा खुलासा करणें बरें.

ज्या ग्रंथाधारें हें नाटक लिहिलें आहे त्याचे कर्त्यास ऑथेल्लो पाहूनच तो ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी असें वाटतें; पण कर्त्यानें तसा उल्लेख केल्याचें कोठें दिसत नाहीं. ऑथेल्लोची प्रतिकृति मराठींत झाली आहे तरी देखील हें थोडक्यांत मजेदार वाटल्यावरून वाचकांपुढें ठेवण्याचें धाडस केलें आहे. बहुतेक संविधानक दोन्हींतही प्रथम एकच वाटण्यासारखें आहे; तरी "आयागो" आणि "बहादर" व "ऑथेल्लो" आणि "प्रतापराव" वगैरे परस्परांशीं सादृश्य असणाऱ्या पात्रांची तुलना केली असतां त्यांमधील फरक मार्मिक वाचकांचे लक्ष्यांत सहज येईल.

ज्या मंडळीनें हा छोटासा ग्रंथ लिहिण्यास उत्तेजन दिलें त्यांचा—विशेषतः मि० यशवंतराव केसकर यांचा ग्रंथकर्ता फार आभारी आहे. असो. लहान पुस्तकास छोटीशीच प्रस्तावना बरी; तेव्हां तें परवानगीवांचून ज्यांस अर्पण केलें आहे त्यांची क्षमा मागून येथेंच ती पुरी करतों.

हरभट पेंडसे.

होतो ) हें वा

## अतिशय प्रेमपूर्वक

मराठी भाषेवर अनंत उपकार
करणाऱ्या एका मित्रास परवानगी-
वांचून अर्पण केलें आहे.

हरभट पेंडसे.

## अंक १ ला

### प्रवेश १ ला.

वादळ. ( बहाद्दर येतो. )

—×*×—

बहाद्दर—मूळ स्वभावच असा आहे माझा कीं फार दिवस विश्रांति मिळाली नाहीं ह्मणून असं झालंय्? कांहीं कळत नाहीं! पण भयंकर कल्पना मनांत आल्या तरी मला त्रास होत नाहीं हें खास. [ गडगडाट होतो ]. हं, असा जिकडे तिकडे गडगडाट न् कडकडाट मला फार आवडतो. [ शशिकला येते ] सागरांतील लाटांनो, आपटा— यापेक्षां देखील जोरानीं आपटा एकमेकांवर. मेघराजा, होईल तितकी भयंकर गर्जना कर. प्रभंजना, चोंहीकडे वायधूळ पसरून दशदिशा व्यापून टाक. विजांनो, गडगडाट करून सगळ्यांच्या कानठाळ्या बसवा—माझ्या दैवगतींत आणि तुमच्यांत पुष्कळ साम्य आहे. माझ्या मनाची जी कांहीं सध्यां स्थिति झाली आहे, तिला तुमच्या सर्वांचा सहवास अतिशय आवडतो. ( शशिकलेकडे पाहून ) कोण तें? शशिकला?

शशिकला—( जवळ येऊन ) कां, आपण उठून कां आलांत? आपण जवळ नसलां ह्मणजे मला फार भीति वाटते. त्यापेक्षां ( कडकडाट होतो ) हें वादळ पुरवलं!

बहाद्दर—अशा या भयंकर रात्रीं मेलेल्या माणसांवाचून कोणाला देखील विश्रांतिसुख मिळणार नाहीं.—पण मला इथेंच विचार करीत बसणं बरं वाटतं. जा, जा— चालती हो. एकट्याला बसायचं आहे मला इथें. कोणी, कोणी जवळ नको माझ्या.

शशिकला— हो, अन् ह्मणूनच आपल्याला एकटं टाकून मीं जायची नाहीं. क्षमा करा, मला नाहीं जाववत टाकून तसंच इथें. ( कडकडाट ऐकून ) अगबाई! विचार करण्याची का वेळ ही? कांहींतरी आपल्या मनांत घोळतंय् तें सांगाच मला. मला कळलंच पाहिजे तें. आपली खरी प्रीति आहे न एकमेकांवर? माझं कुमारिकेचं व्रत टाकून मी आपल्याला माळ घातली; मग आपल्या दुःखाची वांटेकरीण मला करा ह्मणून मी सांगितलं तर हरकत का आहे कांहीं? ( रडूं लागते. )

बहाद्दर— काय— अश्रु? केवढी मूर्ख—पण एक न् हें मात्र ध्यानांत ठेव कीं यांपैकीं एक शब्द कळला कुणाला तर रवरव नरकांत जावं लागेल तुला! तुला आश्चर्यानीं थक्क करून सोडूं होय? सांगूं— सांगूं कीं नको? होय, तुझी ऐकायची इच्छा दिसते. तर मग प्रतापरावचा मला सूड घ्यायचा आहे. (ती दचकते). कां, अशी दचकलीस काय ह्मणून? असह्य वाटतं तुला हें? ठीक आहे— मग सांगेन तर पुढची हकीगत.

शशिकला—महाराजांचा सूड! मला वाटलं ते अगदीं जिवलग दोस्त आहेत आपले?

बहाद्दर—दोस्त? आज सहा वर्षं झालीं, त्या बलाढ्य पुरुषानीं— बलाढ्य ह्मणण्याचं कारण इतकंच कीं त्यानीं बहाद्दराला जिकलं, मला रणांगणांत कैद केलं, माझ्या लाडक्या

बापाला याच अधम चांडाळानीं मारलं आणि माझ्या हातापायांत कड्या घातल्या! मला आपल्याजवळ ठेवून मजजवळून वाटेल ती चाकरी घ्यायाला त्याला बिलकुल शरम वाटली नाहीं. एके दिवशीं—आग लागो त्या दिवसाला—कांहीं कारणानीं ह्मण अगर विनाकारण ह्मण त्यांनीं माझ्यावर हात टाकला! काय—जिवंत असतांना हें बोलतोंय मी? प्राण कां जात नाहीं माझा निघून! त्यांनीं मला मारलं, पण कड्यार भोंसकून त्याच वेळीं मी त्यांचा प्राणांत केला नाहीं; कारण तो भागुबाईपणा! पुळपुळीत सूड तो! तेव्हांपासून तो मोठ्या ममतेनीं मला वागवतो. माझ्या जखमेवर पांघरूण घालण्याचा त्याचा बेत दिसतोय्. त्याला वाटत असेल मी तें विसरलों; पण त्याला असं वाटणं हाच माझा अपमान—त्याची अशी समजूत होणं हीच मला दुसरी जखम करणं आहे! निःसत्व भागुबाई असेल त्याला शत्रूनीं देश जिंकणं, प्रत्यक्ष बापाचा घात झालेला पाहणं आणि अपमान ह्मणजे कांहींच वाटत नसतील कदाचित्. कुत्र्याइतकी देखील ज्याची योग्यता नसेल त्यालाच काय तें सूड घेऊंनये ह्मणून वाटेल!

शशिकला—असं काय हें मेलं? इतकं का संतापायला हवं? जरा शांतपणानीं हकीगत सांगितली तर नाहीं का चालणार?

बहाद्दर—हो—पण हकीगतीच्या योग्यतेप्रमाणें मनोविकारांना ढिलं सोडणं अगर आवरून धरणं बरं नाहीं ह्मणतेस? सर्पाची मुद्दाम खोडी केली तरी देखील त्यानें चावायला धांवूं नये अं? त्यांनीं विनाकारण माझा संताप केला तो मी सहन करूं होय? मी मोठा मानी आहें हें तुला माहित नसलं तर अजून कळेल. दिवस उगवला कीं माझ्या अंगाचा संताप होतो. माझा अपमान झाला त्या वेळेची आठवण झाली कीं माझ्या अंगाची लाही लाही होते. रात्र झाली ह्मणजे मला जरा बरं वाटतं; कारण झोंप लागल्यावर थोडा वेळ तरी त्या गोष्टीचं विस्मरण पडतं—पण छेः! बरं, बरं कसलं? रात्रीं स्वप्नं देखील तींच पडतात! तरी मी कसेतरी दिवस लोटतोंय् आणि पुरा सूड घेण्याला केव्हां एकदां संधि मिळेल ह्मणून अगदीं टपून बसलों आहें. पण अजून संधि मिळाली नव्हती—तरी आतां मला जरा आशा आली आहे. त्याचा अगदीं काळिजा, त्याला प्राणापेक्षां देखील प्रिय अशा त्याच्या महत्वाकांक्षेला ग्रहण लावण्याची मला संधि आली आहे. एकदम छापा घालून ऐन मध्यान्हरात्रीं शत्रूची दाणादाण करण्याचा त्याचा विचार आहे; पण मी शत्रूनीं सावध राहवं ह्मणून अगोदरच तजवीज करून ठेवली आहे. अगदीं आणीबाणीचे प्रसंगीं त्याची युक्ति पुरी फसली ह्मणजे त्याच्या तोंडाला पूर्ण काळोखी लागेल आणि आजपर्यंत मिळविलेली त्याची कीर्ति पार नाहींशी होईल.

शशिकला—मी इकडे आलें तेव्हां नुक्ताच एक लखोटा आला—

बहाद्दर—[ मध्येंच ] कुणाच्या नांवावर होता तो?

शशिकला—पिलाजीरावच्या.

बहाद्दर—ठीक झालं. मना, धीर धर. दैवा, ऐन प्रसंगीं साह्य करून मला पुरा सूड घेउंदे

ह्मणजे माझी जखम अगदीं बुजेल. सूड–सूड ह्मणजे काय? झालेली जखम भरून काढण्याकरतां जें धैर्य लागतें, स्वाभिमान असला ह्मणजे जें स्फुरण चढतें आणि दुसऱ्याच्या मह त्वाकांक्षेस ग्रहण लावून आपलं हेतु साध्य करण्यास जें कांहीं चातुर्य लागतें तोच सूड किंनई? अरे, पण उजाडलं अगदीं! ठीक आहे. चला, मी पिलाजीरावला भेटून माझ्या दैवाची परीक्षा पहातों. ( जातात. )

### प्रवेश २ रा.

राजवाडा. [ पिलाजीराव आणि हैबतराव येतात. ]

हैबतराव–महाराज, लखोट्यांत काय बातमी आली?

पिलाजीराव–शत्रूची दाणादाण आणि प्रतापरावचा जय दुसरं काय? कोणीतरी हेरानीं आपलं गुह्य फोडलं असा त्याचा तर्क आहे; पण शेवटीं विजयश्रीनीं त्यालाच माळ घातली. तो आतां येईल इतक्यांत. त्या वीरश्रेष्ठाला आणि माझ्या अतिशय जिवलग मित्राला मी केव्हां एकदां भेटेन असं मला झालं आहे. मजकरतां मल्लिकेच्या बापापाशीं तो अगदीं मनापासून रदबदली करतोय् हे किती उपकार आहेत त्याचे मजवर?

हैबतराव–पण यश आलं का कांहीं?

पिलाजीराव–तिचा बाप प्रतापरावला फार चाहतो. तशांत पैसा त्याला अतिशय प्रिय असल्यामुळें मल्लिकेनीं माझ्याशींच लग्न लावावे असा त्याचा इरादा आहे. इंद्रायणींत माझी बरीच धनदौलत आहे हें त्याला माहित आहे. वादळांतून माझं जहाज सुखरूपपणें——

हैबतराव–हं, ते पहा हिम्मतराव आपल्या मुलीला घेऊन इकडेच येत आहेत.

पिलाजीराव–( पाहून ) अहाहा! काय सुंदर मूर्ति आहे–पण जा, तुह्मी लवकर बंदरावर जा. जहाज आलं कीं नाहीं शोध करा आणि तावडतोब मला खबर द्या. [ हैबतराव मुजरा करून जातो ]. ईश्वरा, माझं जहाज सुरक्षित पोंहचलं असं वर्तमान येऊं दे ह्मणजे मला फार आनंद होईल. ( हिम्मतराव आणि मल्लिका येतात. )

हिम्मतराव–( रामराम झाल्यावर, ) पिलाजीराव, मी तुमच्याकरतां पुष्कळ रदबदली करतों आहें. बापाच्या नात्यानें होईल तितका उपदेश करण्यास देखील माझ्याकडून कमतरता होत नाहीं.

पिलाजीराव–मी फार आभारी आहें आपला! माझं सर्व सुखदुःख त्यावरच आहे.

हिम्मतराव–मल्लिके, आयुष्यांत सुख मिळणं हें केवळ चांगली निवड अन् शहाणपणा यांवर अवलंबून आहे. पिलाजीराव चांगल्या आणि थोर कुळांतले आहेत. एखाद्या राजासारखी त्यांच्याजवळ संपत्ति असून ते आज ह्मणतील तें होईल. रंकाला राव आणि राजाला गुलाम करूं ह्मटलं तरी देखील ते करतील. केवळ त्यांच्याकरतां महाराजानीं शिद्दी लोकांवर स्वारी केली तेव्हां राजाचं त्यांच्यांवर किती प्रेम असेल हें कांहीं मी सांगायला नको तुला. पिलाजीराव, तुमच्या मनाप्रमाणें व्हावं अशी माझी फार इच्छा आहे. मी येतों आतां. मला वाटतं तुमच्याशीं दोन शब्द बोलायला तिची कांहीं हरकत नाहीं. [ रामराम

करून जातो].

पिलाजीराव—काय मल्लिके, तुझ्या डोळ्यांतून न् अश्रू? पूर्वीपेक्षां मी चांगल्या स्थितींत आहें ह्मणून तुला वाईट वाटतं होय? हिम्मतराव माझ्याशीं बोलायच्या अगोदर तूं अगदीं आनंदी दिसत होतीस; मग—

मल्लिका—( मध्येंच दुःखानें ) माझे अश्रु थांबवण्याचं बाबाच्या हातांत नाहीं असं का समजतां तुह्मी?

पिलाजीराव—अरेरे—केवढं दुर्दैव हें!

मल्लिका—नका, माझ्याकरतां कशाला काळजी करतां? पाहिजे तर ऐकेन मी त्यांचं!

पिलाजीराव—ओढूनताणून प्रेम दाखवणं, प्रीति नाहीं तरी देखील विवाह लावणं, अशी निराश मुद्रा करणं अन् केवळ मनाविरुद्ध वडलांकरतां एखाद्याला माळ घालणं यापेक्षां त्याची अवज्ञा सहस्रपट बरी! माझी प्रीति असून काय करायची नुसती? तुझं सौंदर्य, हे हरणासारखे तुझे डोळे, पोवळ्यासारखे ओंठ आणि चंद्राप्रमाणें चेहरा यांचा, मजवर तुझं खरं प्रेम नसेल तर काय उपयोग? तुझं मन शुद्ध नसेल तर निव्वळ तुझ्या हक्काची पायमल्ली करण्यासारखंच नाहीं का तें?

मल्लिका—महाराज, पुरे. पदर पसरून सांगतें—नका उगीच त्रास करून घेऊं आपल्याला बोलून.

पिलाजीराव—मग माझ्या नशिबीं निराशेशिवाय कांहीं नाहीं अं! नको, नको; माझा कां धीर खचवतेस असा? दोन देखील दिवस झाले नाहींत—मी तुजवर माझं किती अढळ प्रेम आहे तें सगळ्या जगाला दाखवलं! तुझ्याकरतां प्रत्यक्ष मित्राला झिडकारून कीर्तीची देखील पर्वा केली नाहीं. दुसऱ्याच दिवशीं रणांगणांत दाखल व्हावं असा हुकूम आला होता तरी मी तिकडे दुर्लक्ष्य केलं. लढण्याकरतां येईन असं वचन दिलं असून मी तुजकडे प्रथम धांवलों. बंदिमुक्त झाल्यावर पतंगशाहाशीं जें युद्ध झालं त्याचा सर्व भार प्रतापरावावर टाकून त्याला सुद्धां सोडण्यास मी मागेंपुढें पाहिलं नाहीं.

मल्लिका—( आनंददर्शक वाद्यध्वनि ऐकून ) जातें मी—आलेच वाटतं महाराज.

पिलाजीराव—तूं जाणारच तर?

मल्लिका—मी थांबून काय करायचं? मित्र भेटले ह्मणजे तुह्माला आनंद होईल. माझ्या रहाण्यानीं तुह्मांला न् मला दोघांना पण दुखःच! जातेंच मी— त्यांत दोघांचंय् बरं आहे. ( जाते. प्रतापराव येतो. )

प्रतापराव— पिलाजीराव, आत्तां माझ्या जिवांत जीव आला. तुला कडकडून भेटलों ह्मणजे मला फार समाधान वाटेल.

पिलाजीराव— तुझ्यासारख्याला भेटण्यापेक्षां काय अधिक आहे? ( भेटतात ) अमरदेशाच्या राजाला भेटणं केवढं वैभव!

प्रतापराव—नाहीं; यापेक्षां देखील अधिक-पिलाजीरावचा मित्र. तूं जवळ असल्यावर पाहिजे त्याच्यावर स्वारी करणं सोपं आहे. तुझ्याजवळ यायचं ह्मणजे मला मोठा आनंद होतो.

पिलाजीराव—मल्लिकेवर माझं प्रेम आहे—खरंच फार फार मला ती आवडते! तरी पण तुझ्यावर देखील माझी अतोनात भक्ति आहे. ( ब-

हादर येतो. )

बहादर–[ दोघांस मुजरा करून पिलाजीरावास ] महाराज, हैबतराव बंदराकडून आले. त्यांना कांहीं जरूरीच्या कामासंबंधीं आपल्यापाशीं बोलायच आहे—पण एकीकडे आपल्यालाच सांगण्यासारखी हकीगत आहे असं ते ह्मणाले.

पिलाजीराव—एकीकडे? हं! ( प्रतापरावास ) प्रतापराव, आत्तां येतों मी परत. कितीही महत्वाचं काम असलं तरी तुझ्यापासून दूर रहाणं कांहीं मला बरं वाटत नाहीं. [ जातो. ]

बहादर–महाराज, आपल्या हुकुमाप्रमाणें सर्व करून आलों.

प्रतापराव–काय? ती सौंदर्यदेवी इकडून जाईल ह्मणतोस?

बहादर—होय आणि ती पण लवकरच.

प्रतापराव—शाबास! बहादर, तुझ्यापाशीं मोकळ्या मनानीं बोलावसं वाटतं अगदीं. असा सुदिन कधींच उगवला नसेल! पिलाजीरावचा न् माझा अतिशय स्नेह–त्याच्याइतका दुसरा कोणीच लाडका दोस्त नाहीं माझा. त्याला शत्रूच्या बंदिवासांतून मी मुक्त केलं त्यापूर्वींच मल्लिकेच्या बापापाशीं मी रदबदली करावी म्हणून त्यानीं मला सांगितलं; पण मी काय केलं माहित आहे का? माझीच तिच्यावर प्रीति बसली! हा क्षमा करण्यासारखाच अपराध असला तर माझ्या अपराधास थोडसं सौम्य स्वरूप देतां येईल–

बहादर— [ मध्येंच ] कसं महाराज?

प्रतापराव–काय झालं कुणाला माहित, पण त्याचीं मला नेहमी पत्रं येत असत तीच येईनाशीं झालीं न् त्यामुळें शत्रूनीं त्याला मारला असावा असा मी तर्क केला. तेव्हां माझी अशी समजूत असतां माझं मन तिजवर गेलं यांत मोठासा अपराध नसेल असं मला वाटतं.

बहादर—[ एकीकडे ] शाबास, बहादर शाबास! ( उघड ) पण महाराज, त्यांचीं पत्रं आपल्याला पोंहोचलीं नाहींत तेव्हां तीं मध्येंच कोणीतरी दाबलीं ह्मणायचीं! आणखी–इतका दुष्टपणा केला तरी कुणी?

प्रतापराव—दैवाचा कोप दुसरं काय? तिच्यावर माझं प्रेम न् आतां शत्रूच्या हातांतून सोडवलेला जिवलग दोस्तच माझा प्रतिस्पर्धी झाला!

बहादर–पिलाजीरावची सुटका करायला आपल्याला देखील मध्यें पडावं लागलं ह्मणतात?

प्रतापराव—होय, आणि माझ्या जिवाला देखील धक्का पोंहचण्याचा तेव्हां संभव होता. त्याच दिवशीं माझा अंत झाला असता तर किती बरं होतं? अरेरे! आजच त्यांचं लग्न लागणार अं?

बहादर—ती पहा आलीच वाटतं महराज.

प्रतापराव—बरं, मी जातों तर. [ जातो ]

बहादर–जा, जाशील तो पुनः दृष्टीस देखील पडणार नाहींस असाच जा. तला हजारों देह असले तरी देखील मी तुझी आहुती देईन. तुझं मरण तोच माझा आनंद! अरेरे–काय दुर्दैव हें? देश, देश, माझा देश या अधम नरपशूनीं जिंकला! काय, आज सहा वर्षं मी एकसारखा सूड घेण्याकरतां टपलोंय् तें सगळं फुकट अं? याला ठार केलं तर मी कदाचित–पण मी तसा कधींही

मरणार नाहीं. दुसऱ्यांना रडवीन तेव्हांच मा! ह्मा अंत! [ जातो. ]

प्रवेश ३ रा.

( प्रतापराव आणि मल्लिका येतात. )

प्रतापराव—दुःखानीं आंतल्या आंत असं जळणं ह्मणजे लवकरच मृत्यूच्या जबड्यांत पडावं लागणार!

मल्लिका—काय? प्रत्यक्ष राजाच्या तोंडून असे दुःखोद्गार! मला वाटलं शिद्यांचा पराजय करून आपण अमरदेश काबीज केलात तेव्हां-च सर्व दुःखाचा अंत झाला असेल.

प्रतापराव—अरेरे! एकून तुझ्याकरतां दुःखानीं मला इतकं होरपळून काढलं तरी तुला कांहींच त्याचं वाटत नाहीं अं? पण जाऊंदे. तूं कोण? हो, तूं मल्लिका—

मल्लिका—[ मध्येंच ] विकारानीं तुमच्या-वर इतका पगडा बसवला आहे हा तुमचाच अपराध नाहीं का? प्रत्यक्ष मित्राशीं दगलबाजी?

प्रतापराव—मल्लिके! काय करूं मी? मित्रा-करितां ह्मणून मी तुला भेटलों खरा; पण तुला भेटणं म्हणजे तुजवर अधिकाधिक प्रेम बसणं-च आहे. पिलाजीरावाकरितां मी रदबदली—ती पण अगदीं अगदीं मनापासून केली. सांग, तूंच सांग. केली न? यांत माझा कांहीं अपराध आहे होय? तुझं प्रेम—

मल्लिका—( मध्येंच ) तुमच्या अपराधा पासून तुह्मालाच त्रास होत असला तर निरुपाय आहे माझा! जातें तर मी. ( जाऊं लागते ).

प्रतापराव—[ तिचा हात धरून ] मग मजप्रमाणेंच दुसरं कोण दुःखांत झुरत आहे तर?

मल्लिका—नाहीं, तुह्मांला न कळलेलंच बरं. जाऊं द्या मला. [ हात सोडवून डोळे पुसते ]

प्रतापराव—तुझ्या डोळ्यांतून अश्रुबिंदु कां पडतायत् तर?

मल्लिका—सहज! त्यांत कांहीं अर्थ नाहीं; पण आपले दुःखोद्गार ऐकिले त्यांचा तेव्हांच समजलें मी अर्थ.

प्रतापराव—ह्मणजे?

मल्लिका—मी देखील आपल्यावर—पण नको. क्षमा करा मला. मनोविकारांशीं पुष्कळ धडपडलें मी. माझा उपायच चालेना! मी तरी काय करूं? हें ऐकून तुह्माला आश्चर्य वाटेल—हो मला देखील वाटतं. माझा फार अपराध आहे यांत; पण मला एकटीलाच नका दोष देऊं. ज्यानीं हा अपराध मजकडून घडवला त्याला देखील नको का दोष द्यायला?

प्रतापराव—तुला दोष? तुझं प्रेम ह्मणजे मोठाच अनुग्रह हें पक्कं माहित आहे मला खरंच, मनुष्याला कांहीं इतका अनुग्रह करतां नाहीं यायचा कुणावर. देवांगनेखेरीज इतकं मोठं मन कुणाचं असणार? एक वर्षभर मी दुःखांत कुजत पडलोंय त्याचा मोबदलाच आहे तुझं प्रेम म्हणजे! पण मी केवढा दुर्दैवी आहे पहा! माझ्या मित्राला—

मल्लिका—[ मध्येंच ] नशीब!

प्रतापराव—काय, काय म्हणाली माझी लाडकी? बोल, बोल मल्लिके.

मल्लिका—आपल्या प्रेमांत असं विरजण घालणं बरं वाटतं का आपल्याला? विकारानीं अंधळी होऊन आपल्या सद्गुणांची मी विटंब-

ना करून घेईन असं कसं वाटलं तुह्माला?

प्रतापराव—मग लग्नाची तिथी ठरली नाहीं ह्मणतेस?

मल्लिका—हो, बाबांचा विचार होता; पण लग्नाची गोष्ट काढली ह्मणजे मला अतिशय दुःख होतं असं पहातांच ते चुचकळ्यांत पडले. शेवटीं तुमचा काय विचार आहे तो पहावा यावरच त्यांनीं सगळं ठेवलं आहे.

प्रतापराव—केवढं भयंकर काम आलं माझ्या वांट्याला हें! तुला मुकायचं–इतकंच नाहीं तर मी स्वतः होऊन रुकार द्यायचा! नुसतं मरायचं–इतकंच नाहीं पण स्वतः कट्यार भोंसकून घ्यायची!

मल्लिका—कां? आपण असे थरथर कांपतां काय ह्मणून? मला पदरांत घ्यायला भीति वाटते होय आपल्याला? आपल्यावरच सगळं त्यांनीं ठेवलं मग भीति कसली वाटते एवढी?

प्रतापराव—माझ्यावर? होय, माझ्या हातांत एक गोष्ट आहे खरी–माझ्या मित्राला ठार मारणं!

मल्लिका—छेः! तें फार वाईट. त्यांना कशाला? मलाच मारा.

प्रतापराव—सगळेच मेलेले बेहत्तर! नाहीं; मल्लिके, आजन्म माझं प्रेम तुझ्यावर राहील. दुःख ह्मणजे काय तें मला पुरं कळून चुकलंय् तेव्हां मित्राकरतां मला कितीही दुःख झालं न् केवढा घोर गुन्हा मी केला तरी पुरवलं; पण–

मल्लिका—हं, महाराज! माझं ऐका अगोदर. आपल्या सद्गुणांवर आणि रूपावर मी भुललें. आपल्यामुळें मला दुःख झालं तरी देखील आपल्यावर माझं प्रेम कायम राहील. मी दुःख सोसलं तर त्याचाही मोबदला मला मिळेल. खरं प्रेम ह्मणजे काय तें मी जगाला दाखवीन; आणि आपले गुण झांकून राहिले आहेत ते लोकांच्या पुढें आणीन. माझ्या मनांत एकएक विचार यायला लागले ह्मणजे मी अगदीं वेडी होतें; पण त्याबद्दल आपण अगदीं वाईट वाटूं देऊं नका. धीर खचूं न देतां आपले सद्गुण न सोडणं हेंच आपल्याला उचित आहे. मजवर प्रेम जडल्यामुळें आपल्या हातून अनीति घडत असली तर मनोविकारांना अगदीं दाबून टाका. झालं तर तुटला आपला संबंध–पण माझ्याकरतां ह्मणून एखादा भयंकर गुन्हा अगदीं, अगदीं करूं नका! (जाते).

प्रतापराव—गेली–ती अगदीं दृष्टीआड झाली! पुनः ह्मणून मला दिसायची नाहीं! केवढं निर्दय दैव माझं! आतां दुःखानीं झुरून मरण्यापलीकडे कांहीं राहिलं नाहीं! प्रेमा, हालहाल करून तूं मला मारलंस तरी मी तिला कधींही विसरणार नाहीं. (जातो.)

---

## अंक २ रा.

प्रवेश १ ला. [ बहादुर आणि हैबतराव येतात. ]

बहादुर—हें खरं असेल तर पिलाजीराव बद्दल तुह्माला वाईट वाटतं यांत नवल नाहीं. अगदीं साहजीक आहे हें. पण काहो, ही बातमी कळली तरी केव्हां?

हैबतराव—ही परवाच नुक्ती.

बहादुर—काय, एकदेखील जहाज बंदरांत

आलं नाहीं सुरक्षित! अन् हिम्मतरावनीं आपली मुलगी त्यांस देण्याची नाकारली ह्मणतां? मल्लिके सारखं अमूल्य रत्न हातांत आलं असून तें देखील बुडालेल्या संपत्तिबरोबर नाहींसं व्हावं?

हैबतराव–तिचं मनच मुळीं त्यांच्यावर नव्हतं असं ते ह्मणतात आणि तें खरोखर नव्हतं पण. वादळ झाल्यामुळें हें ठरलेलं लग्न फिसकटलं. त्यांची संपत्ति जातांच ते हिम्मतरावाच्या मनांतून उतरले. पैशावाचून तिच्या बापाला दुसरं कांहीं दिसत नाहीं. मग हा त्याचाच दोष असो अगर त्याच्या वयाचा असो.

बहाद्दर–पण पिलाजीरावला हें सहन कसं झालं?

हैबतराव–ते केवढे धिराचे आणि विचारी पुरुष! फारच सहनशिलता दाखवली त्यांनीं.

बहाद्दर–ते अगदीं निराश झाले असतील पण?

हैबतराव–हो, पुनः ह्मणून मल्लिकेचं तोंड दिसणार नाहीं अशीं त्यांची खात्री झाली. तशांत आजच तिच्या बापानीं प्रतापरावला तुमचं तिजवर प्रेम आहे तर तिच्याशीं लग्न करा ह्मणून रुकार दिला– अर्थात यामुळें पुढील सर्व आशेला ग्रहणच लागलं ह्मणायचं पिलाजीरावच्या!

बहाद्दर–मग प्रतापरावला मोठा आनंद झाला असेल नाहीं?

हैबतराव–होय झाला प्रथम; पण लवकरच ते फिके पडले–असं करणं केवळ मित्राचा जीव घेणं आहे ह्मणून त्यांस वाटलं.

बहाद्दर–पिलाजीरावची संमति असेल तर असंच कांहीं ह्मणतां येत नाहीं केवळ. तशांत त्यांना नाहींतर त्यांच्या मित्राला तरी ती मिळणारच.

हैबतराव–तें खरं; पण मोठ्या मनाच्या माणसाला असं विचारायलाच केवढं संकट वाटतं! निदान प्रतापरावला तें अगदीं विलक्षण वाटणं साहजिक आहे. बरं मी जातों पण आतां. अशा प्रसंगीं पिलाजीरावजवळ असणं बरं. [ रामराम करून जातो ]

बहाद्दर–काय, उजाडलं! समुद्रांत वादळानीं कहर उसळल्यामुळें हताश होऊन शेवटीं जमीन दिसावी त्याप्रमाणें माझी स्थिति झाली आहे. अरे, ही आलीच वाटतं! [ शशिकला येते ] या स्थितींत रहाण्यापेक्षां मृत्यु बरा ह्मणून वाटूं लागलं होतं; पण आतां बरीच आशा आली आहे. सूड अजून अग्निसारखा धुमसत आहे अन् त्यामुळें मला अधिकाधिक उल्हास वाटतो! शशिकले, पिलाजीराव केव्हां आला बंदरावरून परत?

शशिकला–परवाच रात्रीं.

बहाद्दर–हं, बरोबर आहे; पण किती वाजतां सुमारे?

मल्लिका–मला वाटतं, असं दहा वाजतां असेल.

बहाद्दर–पतंगशहाशीं लढण्याकरतां प्रतापराव गेले, तेव्हां युद्धाचं देखील त्याला विस्मरण पडून तो मल्लिकेकडे गेला–इतका उताविळ झाला होता तो; पण या खेपेला कांहीं मला वाटतं तो उल्हास राहिला नसेल? मग–बरं पण मल्लिकेची न् त्याची भेट झाली काही बातमी कळल्यावर?

मल्लिका—नाहीं--हो नाहींच झाली.

बहाद्दर—नाहीं? ठीक आहे; चिंता नाहीं. जा, कागद न् दऊतलेखणी घेऊन ये पाहूं. (ती जाते). दोन दिवस झाले, बाबा माझ्या स्वप्नांत आले होते. तीन वेळां माझ्या बिछान्याभोंवतीं फिरून ते हंसले. त्यांना कांहींतरी आनंद झाला असावा. हो, खास—त्यांच्याकरतां मी सूड घेणार ह्मणूनच ते हंसले असतील. ( शशिकला येते. तो कांहीं लिहितो ). होय, असंच. हिम्मतरावचा बेत कायम झाला. पिलाजीरावला मल्लिका मिळत नाहीं हें ठरलंच. प्रतापरावला कांहीं त्याची संमति आपण होऊन मिळवतां येत नाहीं. बरं, त्यानीं त्याला विचारलंच तर एकदम होकार मिळणं कठीणच. आपल्याला मल्लिका मिळत नाहीं तरी दुसऱ्याला पिलाजीराव सहज संमति देईलच असं नाहीं. ठीक आहे. प्रतापरावला तूं त्याला विचार ह्मणून सांगावं आणि पिलाजीरावचं संमति दे ह्मणून मन वळवावं. संमति मिळून लग्न झालं कीं लागलेच प्रतापरावचे पिलाजीरावविरुद्ध कान भरावेत. त्याचं प्रेम किती पोकळ आहे ह्मणून याची खात्री करावी न् याच्या सुखाचा विध्वंस करावा. हो झालं. हें नुकळलं सगळं. प्रिय मित्रांच्या मनांत एकमेकांविषयीं द्वेष आला कीं झालाच दुःखाचा कळस. जिवंतपणीं नरकयातना त्या! कलुषित मन झालं कीं त्याच्या सुखाचा पूर्ण नायनाट होईल!

शशिकला—प्रतापराव येतायत इकडून.

बहाद्दर—उत्तमच झालं. जा तूं. [ शशिकला जाते ]. आरमार, सैन्य आणि दारूगोळा यांपेक्षां जास्त हाहाःकार उडवणाऱ्या राजदरबारांतील पिशाच्च डांकिणी ह्मणजे ढोंग, हांजीहाजी हींच आहेत. तेव्हां त्यांचीच मदत मला फार उपयोगी पडेल. या, या—राजपदाभोंवतीं गुप्तरूपानीं वास्तव्य करणाऱ्या पिशाच्च डांकिणींनो, मला साह्य करा. तुमच्या काळ्याबेऱ्या युक्त्या मला शिकवा. आंत एक आणि बाहेर निराळंच असं स्वरूप मला द्या ह्मणजे शत्रूस जाळ्यांत पकडून शेवटीं मी त्यांचा चेंदामेंदा करीन. [ प्रतापराव येतो ]. महाराज, मला फार आनंद झाला.

प्रतापराव—कसला?

बहाद्दर—एक अत्यंत मोलवान रत्न आपल्याला मिळालं नाहीं?

प्रतापराव—पण पिलाजीराव—

बहाद्दर—ते मित्रच आहेत आपले. स्वतःला मल्लिका मिळाली नाहीं तरी निदान मित्राच्याच गळ्यांत तिनीं माळ घातली ह्मणून थोडंसं समाधान वाटेल त्यांना?

प्रतापराव—छेः! वेड्या, प्रेमाचा जोर तुला माहित नाहीं. प्रेमांध लोक अगदीं बेहोष होतात! गणगोत अगर मित्र यांची त्यांस बिलकुल पर्वा रहात नाहीं. त्यांचं मन कलुषित झालं नाहीं, तोंपर्यंत ठीक आहे. पिलाजीरावर माझं अतिशय प्रेम आहे, तरी त्याचं मल्लिकेशीं लग्न लागणार ही बातमी ऐकतांच माझी काय स्थिति झाली तें मला पुरं माहित आहे. त्या वेळेस माझी स्थिति पाहून मला दुःख झालं तसंच आतां त्याच्याबद्दल मला फार वाईट वाटतं.

बहाद्दर—मग मल्लिकेशीं लग्न नाहीं करीत

तर आपण?

प्रतापराव–आत्तांच्या आत्तांच नाहीं–कारण अगोदरच होरपळून निघालेल्या मनावर डाग देण्यासारखंच नाहीं का तें?

बहाद्दर–हो, समजलों. पुढेंमागें होईल तर? आपले मित्र येथून गेल्यावर अगर त्यांचं दुःख जरा कमी झाल्यावर–होय न?

प्रतापराव–माझा कांहीं दोष आहे यांत?

बहाद्दर—महाराज, आपले दोष देखील मला आवडतात; कारण मुळाशीं सद्गुण आहे हें मला माहित आहे. मित्रप्रेम–खरंच यापेक्षां आपल्या हृदयांत अधिक चांगलं काय असणार? मी ह्मणतों मित्रप्रेमाला फाजील महत्व देऊन आपण सर्वस्वी नाश करून घेत आहां. हिम्मतरावनीं पिलाजीरावला वचन दिलं असून तें मोडलं काय ह्मणून? अन् आपल्याला मुलगी द्यायला ते काय ह्मणून तयार झाले? केवळ पैशाकरतां नाहीं का? उद्यां कदाचित् आपलं दैव फिरलं तर तिथें काय–सगळं पैशाकरतां आहे बोलूनचालून! धनवान तो गुणवान याशिवाय ह्मातारा काय पहातोय? शिवाय पुष्कळ राजपुत्रांच्या मागण्या देखील आल्या आहेत मल्लिकेला. पिलाजीराव गेल्यावर आपण तिच्याशीं लग्न लावणार, पण आत्तांच लावयाला काय हरकत आहे? लग्न लावायचंच मग आज लागलं काय अन् लागल्यावर त्यांना कळलं काय एकच. पिलाजीराव तर तिला मुकलेच; आतां आपण पण हातांतली घालवणं ह्मणजे मला तर वाटतं बुवा कीं मित्राच्या दुःखांत भर घालण्यासारखंच आहे तें. मित्राला वाईट वाटूं नये ह्मणून आजच्या आज आपण लग्न उरकून घेत नाहीं; पण हाच आपल्या मनाचा कोंवळेपणा, ती दुसऱ्याच्या हातांत पडली तर पिलाजीरावला न् खुद्द आपल्याला किती टोंचील? ( एकीकडे ) हं, हें ठीक आहे. चल बिचल उडाली! स्वारी थांबली—

प्रतापराव—बहाद्दर?

बहाद्दर—काय महाराज?

प्रतापराव—पिलाजीरावला विचारूं ह्मणतोस? तो मनाचा थोर आहे खरा–पण मी तिच्याशीं लग्न करावं अशी संमति देईल तो?

बहाद्दर–मला तर वाटतं बुवा.

प्रतापराव—पण तसं विचारणं केवढं निर्दयपणाचं काम आहे? आणि प्रत्यक्ष त्याला मी होऊन विचारायचं!

बहाद्दर–मला वाटतं–लग्न न करणं हाच निर्दयपणा आहे. हें पहा, त्यांना सोडवून आपणच नाहीं का त्यांचा जीव वांचवला?

प्रतापराव—होय आणि ह्मणूनच मी जरा मागेंपुढें पहातों. मी अगदीं परका असतों तर मला खुशाल मोकळ्या मनानीं विचारतां आलं असतं. मीच होऊन तसं विचारणं ह्मणजे जणूं काय त्याच्यावर केलेल्या उपकाराबद्दल जबरदस्तीनं मोबदलाच मागणं आहे. निदान–मला तर चमत्कारिकच वाटतं तें!

बहाद्दर—तें खरं; पण महाराज, तिथें कांहीं उपायच नाहीं दुसरा. कोणीतरी थोडंसं दुःख सोसावं. तको देखील मल्लिकेची योग्यता नाहीं का? पिलाजीरावचं बरं व्हावं अशी आपल्यासारखी माझी देखील फार इच्छा आहे; पण मला आपल्याकडे देखील पाहिलं पाहिजे. इ-

थंच कायतो आपल्या दोघांत फरक आहे. आपण एकट्या त्यांच्या कल्याणाकडे पाहतां—मला दोघांच्या पण पहावं लागतं. मी न् आपण दोन का आहोंत? शिवाय—मी मोकळ्या मनानीं बोलतों याबद्दल क्षमा असावी; आपण चांगल्या हेतूनींच कां होईना, पण जी चूक करीत आहां तिच्यामुळें पुढें फार दुःख होईल इकडे लक्ष्य द्या. एखाद्या अनुदार पुरुषाच्या हातांत ती पडली तर तिला किती दुःख होईल? द्रव्याकडे पाहून एखाद्या माकडाला देखील हिम्मतराव आपली मुलगी देतील. मोठा राजपुत्र असला—पण तो अगदीं वयोवृद्ध होऊन मरायला टेंकला आहे अशाच्या हातीं हें रत्न लागलं तर तें सहन होईल का आपल्याला?

प्रतापराव—बिलकुल नाहीं! एखाद्या थेरड्या माकडाला—मग तो मोठा राजा का असेना, अशी स्त्री मिळणं ह्मणजे हिऱ्याला उकिरड्यावर फेंकणं आहे! मला धीर झाला तर मी स्वतः पिलाजीरावपाशीं ही गोष्ट काढीन. त्याच्यावर हा प्रसंग कोसळल्यापासून मी अझून त्याला भेटलों नाहीं. त्याचं दुःख पाहवणार नाहीं, ह्मणून मुद्दाम लांबणीवर टाकलं होतं मी त्याला भेटायचं; पण आतां कसं सहन होईल हें? असो, माझं हृदय बरंच कठीण झाल्यू तेव्हां जातोंच मी त्याच्याकडे. ( जातो. )

बहाद्दर—झालं, अर्धं काम आटोपलं. आतां, ही स्वारी पिलाजीरावला भेटण्यापूर्वींच आपण त्याला गांठलं पाहिजे. ( जातो. )

प्रवेश २ रा. [ बहाद्दर येतो ].

बहाद्दर—हैबतराव बरोबर निरोप तर पाठवला. माझ्या देशबांधवांचं रक्त पिऊन मस्त झालेल्या नगरा, तूं माझ्या डोळ्यांत किती सलत आहेस याची तुला कल्पना तरी आहे का? तुझ्या नरडीचा घोंट घेण्याकरतां मी अगदीं रात्रंदिवस टपून बसलों आहें हें तुझ्या मनांत तरी आलं आहे का अझून? कोणीतरी बलाढ्य पुरूष तुझा विध्वंस करण्याकरतां उद्युक्त झाला आहे हें तुझ्या अझून कसं लक्ष्यांत येत नाहीं? आपला नायनाट होणार अशा भीतीनीं तुझ्यांतील मनोरे, मोठमोठ्या इमारती आणि राजगृहें थरथर कशीं कांपत नाहींत? प्रतापरावावर तुझी खरी भक्ति असेल तर धरणीकंप होऊंदे ह्मणजे दुश्चिन्हं पाहून तो सावध होईल. माझ्या देशावर छत्र धरणाऱ्या देवदूतांनो, तुमच्या लाडक्या पुत्रांवर तुटून पडून तुमची अवज्ञा करणाऱ्या या मदोन्मत्त राक्षसाचे हालहाल करण्यास मला साह्य करा. या अधमाधम नरपशूची राखरांगोळी करण्यास मला हातभार लावा. मल्लिकेसारखं अमूल्य रत्न खरोखर आपल्याच देशांत राहण्याकरतां निर्माण झालं असून हा अघोर कृति करणारा पिशाचमूर्ति तिच्याकरतां झुरत आहे त्यांत त्याची पुरी निराशा करा. दुःखानीं हृदय फाटून त्याचीं छकलं छकलं होउं द्या. मल्लिकेशीं रत होऊन प्रत्यक्ष स्वर्गसुखाचा उपभोग त्याला इथेंच—पण नको; अशी कल्पना सुद्धां मनांत येणं ह्मणजे त्या कुत्र्याला फाजिल योग्यता देणं आहे! तिचा मनोहरपणा त्याच्या अंगाची लाहीलाही—अरे! हा पहा पिलाजीराव आला वाटतं. [ पिलाजीराव

येतो. ]

पिलाजीराव—अरेरे! आशेवर फाजील भरंवसा ठेवून मी किती फसलों! किती दिवस तिनें मला काळ कोठीत बसवलं! आशा म्हणजे केवळ हरणाचं रूप घेतलेली राक्षसी! या जगांत अतिशय मूर्ख किंवा खरोखर शहाणे यावांचून कुणाला देखील खरं सुख मिळत नाहीं. सांवलीच्या पाठीमागें धांवणारा आणि खोट्या सुखांतच आनंद मानणारा महामूर्ख मी बनलों नाहीं म्हणूनच मी आपला काळ दुःखांत घालवीत आहें नाहीं? पण छेः! मुळाशीं दुःख असून देखील वरकांति सुखाला भुलण्याइतका शहाणा मी अजून झालों नाहीं. सुख—सुख म्हणजे काय? सुख म्हणजे दुःखच! कारण तें फार दिवस कुठें टिकतं? या जगांत केवळ मनाविरुद्ध किती लोक हंसतात! आपण आनंदी आहोंत आणि आपल्याला काडीइतकं देखील दुःख नाहीं असं कितीजण वरवर दाखवतात! हें सगळं आपल्याला माहीत असून, आपण मुद्दाम डोळेझांक करतों आणि एकदां अपयश आलं तरी देखील पुनः पुनः आशेला बळी पडून इच्छित वस्तु मिळण्याकरतां धडपडतों हा केवढा मूर्खपणा? नवे नवे अनुभव येत गेले अन् ठेंचा लागल्या तरी कितीजण फसतात?

बहाद्दर—महाराज, मला फार वाईट वाटतं आपली स्थिति पाहून—पण आतां बिलकुल आशा उरली नाहीं म्हणतां?

पिलाजीराव—आशा? नांव नको! हिम्मतराव म्हणजे केवढा पाषाणहृदयी तो! त्या पोरट्याची उक्ति म्हणजे काळ्या फत्तरावरची रेघ! तें ठरलं—गेलं! छेः! पूर्ण निराशेवांचून गोष्ट नाहीं दुसरी. आशेला काडीइतकी देखील जागा नाहीं!

बहाद्दर—आपल्याला इतकं कांहीं दुःख झालंय् कीं मित्राबद्दल वाईट वाटायला आपल्या अंतःकरणांत जागाच नाहीं!

पिलाजीराव—समजलों मी. प्रतापरावचं तिजवर मन गेलं आहे—फार दया येते त्याची मला!

बहाद्दर—तें कबूल आहे मला; पण त्यांचा कांहीं निराळाच विचार आहे.

पिलाजीराव—म्हणजे? मला नाहीं खरं वाटत!

बहाद्दर—खोटं नाहीं सांगत मी. एखाद्या परक्यासारखं विचारायला त्यांना भीति वाटते इतकंच. आपल्याला ज्याबद्दल कांहींच वाटणार नाहीं त्याला ते किती महत्व देतात! नाहीं, इतकंच नाहीं तर ज्यामुळें मित्राला सुख होऊन आपली कीर्ति होईल अशी देखील गोष्ट काढणं त्यांना बरं वाटत नाहीं.

पिलाजीराव—कृपाकरून स्पष्ट काय असेल तें सांग. त्याचं तेंच माझं सुख असं मी समजतों.

बहाद्दर—त्यापेक्षां मरण बरं असं ते म्हणतात; पण आपल्याकडे देखील पाहिलं पाहिजे असंही त्यांना वाटतं. आपल्या परवानगीवांचून तिच्याशीं लग्न करणं कांहीं त्यांना पसंत नाहीं न् परवानगी विचारायला तर मन कचरतं! फारच दया येण्यासारखी त्यांची ती स्थिति, आपला शहाणपणा न् दूरदर्शित्व, ती मिळत नाहीं यामुळें झालेली आप-

ली निराशा आणि कांहीं झालं तरी मित्राला सुख देण्याची परस्परांची अनिवार इच्छा या सर्व गोष्टी मनांत आणून मी एक धाडस केलं आहे–ह्मणजे आपली परवानगी घेतल्यावांचून केवळ आपल्या थोरपणावर भरंवसा ठेवून मी तें केलं. राग येणार नाहीं तर सांगतों सर्व हकीगत.

पिलाजीराव–नाहीं येणार–सांग. तूं मोठा धोरणी आहेस अशी आमची दोघांची पण खात्री आहे.

बहाद्दर–त्यांनीं आपल्यापाशीं गोष्ट काढावीच ह्मणून त्यांना मी आग्रह केला–नाहीं, त्यांच्या मनांत नव्हतं, तरी काढीन असं अगदीं वचनच घेतलं मी. याबद्दल क्षमा असावी–पण दोघांचं कल्याण पाहणं माझं कर्तव्य आहे. आपणा उभयतांना सुख व्हावं अशी माझी मनापासून इच्छा; तेव्हां रागाच्या झपाट्यांत आपण प्राण घेतला तरी बेहत्तर—पण आपल्या हिताकरतां झटायचं असा निश्चय करून त्यांची संमति घेऊन मी इकडे आलों.

पिलाजीराव–अरेरे! त्याच्याशींच तिचं लग्न लागलं तर, झाला–माझा सत्यानाश झाला मग! असं झालं तर प्रत्यक्ष तिच्या बापाच्या सुद्धां हातांत कांहीं राहणार नाहीं.

बहाद्दर–महाराज, तो किती कठोर मनाचा आहे माहित नाहीं का आपल्याला? झालं–ठरलं तें! पूर्ण निराशेवांचून दुसरं कांहीं नाहीं असं आपणच नाहीं का ह्मणालांत?

पिलाजीराव–कसं सहन होईल हें! ती मला मिळत नाहीं इतकंच बस्स नाहीं अं? खुद्द माझी संमति! प्रतापरावला रुकार दिलाच पाहिजे नाहीं? स्वतः आपण होऊन मी तिला दुसऱ्याच्या स्वाधीन करायची! हा–मल्लिके! मल्लिके!

बहाद्दर–[ एकीकडे ] सत्यानाश हो तुझा! चोरा, कबूल होत नाहींस अं?

पिलाजीराव–काय, तिच्याशीं लग्न? नि आज?

बहाद्दर–आज किंवा कधींच नाहीं! उद्यां जर एखादा पैसेवाला भेटला तर आपल्याप्रमाणें प्रतापरावला पण धुडकावलंच समजा. असं झालं तर कुणाला दोष द्यावा महाराजानीं? तिच्या बापाप्रमाणें आपण देखील आपल्या मित्राच्या सुखाआड यावं हें केवढं दुर्दैव!

पिलाजीराव–काय करूं! कुठें जाऊं मी?

बहाद्दर–शांतिगृहाकडे!

पिलाजीराव–रस्ता?

बहाद्दर–त्यांचं तेंच आपलं सुख–हो आपणच असं ह्मणालांत! आपल्यावर कसा भरंवसा ठेवूं नको मी?

पिलाजीराव–मित्राला ठार मारणं–नाहीं; यापेक्षां देखील वाईट–छेः! याहून दुःसह काय आहे दुसरं? होय, आहे–पण मी कसं सहन करूं तें?

बहाद्दर—होय, तें कठीण आहे ह्मणून आपण माझी खात्री केलीत खरी–पण आजच सकाळीं महाराजानीं तिची भेट घेतली. मला फारच विलक्षण वाटलं तें! तरी आपल्याकरतां —केवळ आपल्याकरतां बरं, त्यांनीं तें मोकळ्या मनानीं मला सांगितलं. मला वाटलं होतं तितकं तें विलक्षण नाहीं अशी माझी

खात्री केली त्यांनीं—अन् हें कां, तर केवळ आपल्याकडे पाहून!

पिलाजीराव—माझ्या कोपाग्नींत तेल ओतून तो अधिकाधिक भडकवतोयस तूं!

बहादर—छेः! छेः! काय फुटक्या नशिबाचा आहें मी पहा! आपण कबूलच होत नाहीं तेव्हां मोठ्या कष्टानीं मी आपल्याला तें सांगितलं. मी तरी कसा पेंचांत सांपडलोंय् पहा! मी सांगितलं नसतं तर महाराजांच्या जिवावरची गोष्ट ती—बरं, सांगावं तर आपल्याला दुःख! मिळून मधल्यामधेंच माझे हाल चालले आहेत! पण माझ्याबद्दल मला बिलकुल वाटत नाहीं कांहीं—तरी, त्यांच्या मरणाला आपणच कारण व्हावं—

पिलाजीराव—( मध्येंच ) मी? मी त्याला मारतों? होय खरं आहे! मग मीच तिला त्याच्या स्वाधीन करायची ह्मणतोस? काय पत्करूं मी? मरणं अगर मारणं? जा. बहादर, दोन्ही असह्यच! कांहीं केलं तरी एक दुःख सहन करावं लागणार! तूं कसंही करून ही गोष्ट लांबणीवर टाक. एक दिवसच का होईना—न जाणो मित्रप्रेम आणि प्रीतिस्पर्धा, दोन्हो विकारांमुळें होणारे अनर्थ टळतील. जा, प्रतापरावला ह्मणावं सध्यांच मला भेटूं नको. मरणापेक्षां देखील भयंकर अशी ती गोष्ट निघणार नाहीं अशी व्यवस्था कर.

बहादर—महाराज, आपण सांगाल तें ऐकणं माझं काम आहे. [ एकीकडे ] असं? मूर्खा, त्याची तुझी भेट होणंच तर मला इष्ट आहे. येऊं नको ह्मणून तर नाहींच सांगत, पण उलट घेऊन येतों त्याला. ( जातो ).

पिलाजीराव—जग, जग ह्मणजे काय? अरेरे! दुःखाचें आगर! दुःखं कशीं सहन करावीं याशिवाय काय आहे आणखी शिकण्याचं जगांत? अन् हें ज्याला कळत नसेल तो व्यर्थ जन्माला आला ह्मणायचा! मी अगदीं दुःखाखालीं दडपून गेलों होतों तरी मला थोडीशी आशा उरली होती; पण ती देखील पार नाहींशी होऊन प्रत्येक दिवशीं मृत्यु कसा अगदीं डोळे वटारून मजकडे पहात आहे! दुःख अगदीं असह्य झालं ह्मणजे जगणं बरं का मरणं बरं? मी जगलों, माझं आयुष्य पुष्कळ असलं—पण छेः! पुष्कळ ह्मणजे काय? काळाला अंतच नाहीं! मनुष्याच्या आयुष्यांत—पण साठसत्तर वर्षं ह्मणजे कांहींच नाहीं. तरी पण मक्षिकेच्या हातांत आहे नाहीं हें सगळं? तिनें मनांतच आणलं तर सत्तर वर्षं ह्मणजे कांहीं थोडा काळ नाहीं. तिच्या सौंदर्यानें डोळे दिपून मी अगदीं अंधळा झालों होतों तेव्हां वर्षं केवळ दिवसाप्रमाणें वाटत—एक दिवस ह्मणजे केवळ क्षणासारखा निघून जाई! इतका काळ लोटला, अमुक महिने झाले असं कळलं ह्मणजे मला आश्चर्य वाटे; पण दुर्दैवाची वक्रदृष्टि होतांच एक पळ ह्मणजे युगाप्रमाणें भासूं लागलं! ( बहादर आणि प्रतापराव येतात. )

बहादर—पिलाजीराव, हेच—हेच न आपले जिवलग मित्र? पहा, पहा त्यांच्याकडे न् मग पाहिजे तर मित्रप्रेमावर पाणी सोडा. दुःखानें ते पहा कसे अगदीं हताश झाल्यासारखे दिसायतात. आणखीं दुःख कुणाचें? त्यांचं स्वतःचं नाहीं बरं. मनांत आणलं तर

तुमच्या संमतीवांचून देखील नाहीं का त्यांना लग्न लावतां येणार तिच्याशीं? पण तसं त्यांना मुळींच आवडत नाहीं—तुमच्याकडे पाहतात ते.

पिलाजीराव—मला नाहीं हो ह्मणवत! अन् त्याचं दुःख पण मला पाहवत नाहीं! ( हात धरून ) प्रतापराव—

प्रतापराव—( मध्येंच ) अरेरे! पिलाजी—

पिलाजीराव—[ मध्येंच ] नको, नको बोलूं. मला नाहीं सहन होणार!

प्रतापराव—तुला दुःखांत पाहिलं ह्मणजे मला आनंद होईल होय? कांहीं अशीं मीच तुझ्या दुःखाला कारण झालों. मला फार वाईट वाटतं त्याबद्दल! तुझ्याकरतां मी रदबदली करायला गेलों—पण छेः! मला नाहीं बोलवत!

बहाद्दर—महाराज, भलत्याच प्रसंगीं असे उद्गार काढणें ह्मणजे मित्राला अधिकाधिक दुःख देणं आहे. बोलणं मोठं जिवावर येतं खरं— पण उपाय नाहीं. बोलल्यावांचून कसं होईल?

प्रतापराव—काय बोलूं मी अशा प्रसंगीं! मी रदबदली करायला गेलों न् माझंच प्रेम तिच्यावर बसलं! पिलाजीराव, मजवर शिव्या न् शाप यांचा वर्षाव कर, मला जगांतून नाहींसा कर ह्मणजे मित्राशीं कसं वागावं तें जगाला कळेल न् माझं उदाहरण पाहून खरं मित्रप्रेम ह्मणजे काय तें लोकांना शिकतां येईल.

पिलाजीराव—छेः! उगीच दोष देतोस तूं स्वतःला. माझाच अपराध आहे त्यांत; तुजवर मी अशीच कांहीं कामागिरी सोंपवली कीं त्यांत तूंच गुरफटला जावास!

प्रतापराव—माझे दोष एकीकडे ठेवून तूं सगळं चांगल्या दृष्टीनीं पाहतोस हा थोरपणा आहे तुझा; पण मजकडून अपराध होण्याला तूंच कारण झालास असं तूं बिलकुल समजूं नको. त्यांत माझाच दोष आहे हें मला पक्कं माहित आहे. त्याबद्दल मी क्षमा मागतों—आणि तूं हा अपराध पोटांत घातलास तर मला थोडंसं तरी समाधान वाटेल.

पिलाजीराव—क्षमा न् तुला? मल्लिकेवर बसलेल्या ज्याच्या प्रेमशशांकाला पूर्ण ग्रहण लागलं, तिच्याकरतां रडून रडून ज्यानीं डोळे सुजवले आणि आतां ह्मणून ती मिळण्याची ज्याला आशा नाहीं त्यालाच तूं क्षमा कर. मल्लिकेचा बाप आपण होऊन तुला ती देत असतां केवळ मित्राकरतां तूं अजून थांबला आहेस हा किती मोठेपणा आहे तुझ्या मनाचा! वास्तविक मल्लिकेसारखी सौंदर्यपुतळी मिळत आहे असं कळतांच कोणीही आनंदानीं वेडा होईल—पण केवळ मजकरतां तूं बिलकुल आनंद न मानतां दुःखीच दिसतोस हे किती उपकार आहेत तुझे मजवर? आणि ह्मणूनच मी अगदीं मोकळ्या मनानीं सांगतों कीं तुला ज्यापासून आनंद तेंच करण्यास मी तयार आहें. मी आतां जिवंत राहणार तो फक्त तुझ्याकरतां! तुला सुख व्हांव इतकीच माझी इच्छा आहे.

बहाद्दर—[ प्रतापरावास ] हं महाराज, आतां मागेंपुढें नका पाहूं; मोकळ्या मनानीं कायतें बोला.

प्रतापराव—काय? त्याचं इतकं प्रेम मजवर आहे ह्मणून? छेः! आणि ह्मणूनच तसं करणं

अधिकच वाईट. दुःखानीं तो अगदीं होरपळून गेला आहे आणि तशांत मी होऊन त्याला वाईट वाटेल असं करूं? बिलकुल नाहीं— प्रेमवासने, जा, जा; पार नाहींशी हो. बस्स, पुरे तुझी संगति! मित्रप्रेमाशिवाय कांहीं नको मला. [ पिलाजीरावला मिठी मारतो. ]

पिलाजीराव—कोण विलक्षण प्रसंग—प्रतापराव, केवढा मनोविकारांचा झगडा चाललाय् हा?

प्रतापराव—( मिठी सोडून ) पिलाजीराव, मृत्यूनंतर आपल्याला पाहतां येईल, मृत्यु आल्यावर आपल्याला बोलतां येईल, आपले विचार यमपुरीस एकमेकाला कळवतां येतील आणि निरंतर डोळे मिटल्यावर मित्रांला मित्र भेटत असतील तर तिथें देखील तुला कळेल कीं मृत्युलोकांत तुझ्यापेक्षां मला कांहींच आधिक नव्हतं—नको, नको पण! चाललोंच मी.

पिलाजीराव—( जात असतां त्यास धरून ) हं हं, प्रतापराव थांब. [ आपल्याशींच ] केवढं मित्रप्रेम हें? मला वाईट वाटेल ह्मणून बोलणं देखील किती जिवावर आलंय् त्याच्या! मल्लिकेवर बसलल्या प्रेमानीं शेवटीं मला रडत बसवलं तसंच मी कीर्तीला देखील मुकणार नाहीं? [ उघड ] प्रतापराव, तूं माझ्याशीं बोलत देखील नाहींस इतका तूं मला हलक्या मनाचा समजतोस? तुझं अंतःकरण अगदीं फुटून जाण्याच्या बेतांत आलं आहे तरी देखील मोकळ्या मनानीं बोलणं तुला बरं वाटत नाहीं अं? माझा तुझा काय संबंध आहे तूं विसरलास होय? तूं माझा जीव वांचवून मला स्वतंत्रता दिलीस हे थोडे का उपकार आहेत सजवर तुझे?

प्रतापराव—होय, आणि ह्मणूनच मला बोलवत नाहीं. तें एकसारखं माझ्या मनांत खात आहे! नकार मिळायचाच नाहीं अशी खात्री असतांना कांहीं विचारणं किती जिवावरचं काम आहे!

पिलाजीराव—( आपल्याशींच ) अहाहा! केवढं थोर मन हें? प्रत्येक गोष्टींत शतपटीनीं श्रेष्ठ आहे हा माझ्यापेक्षां. ( उघड ) मग मोकळ्या मनानीं बोलून कायतें नाहीं का विचारीत तूं मला?

प्रतापराव—छेः! मला नाहीं धैर्य होत!

बहादूर—( प्रतापरावास ) मग घालवा तर तिला हातची!

पिलाजीराव—शाबास,धन्य आहे तुझी प्रतापराव! इतकं मन ताब्यांत ठेवून माझ्याकरतां कितीतरी दुःख सोसतोयस तूं? खरंच, मला तुझ्याइतकं दुःख व्हावं अशी फार इच्छा आहे माझी. मोठ्या धैर्यानीं असं दुःख सोसणं कांहीं कमी वैभव नाहीं! तुझ्याएवढं माझं मन थोर असतं तर मला कितीतरी आनंद झाला असता? पण नाहीं, तसं झालंच पाहिजे. स्वर्गवासी पितरांनो, मला धीर द्या. मी मनाचा हलकेपणा दाखवणं ह्मणजे तुमच्या कुळाला कलंक लावणं आहे. माझा मित्र केवळ सौजन्य आणि थोरपणा यांमुळेंच माझी संमति विचारायला मागेंपुढें पहात आहे तेव्हां—ती आपण होऊनच मी त्याला देतों!

प्रतापराव—काय! काय ह्मणालास तूं पिलाजीराव?

पिलाजीराव—हें पहा, माझं एक नीट. हिम्मतराव न् दुर्दैव या दोघांनीं तिला मजपासून हिसकून घेतली. माझ्या आशेचीं पाळंमुळं खणून काढून त्यांनीं मला जिवंत आणि मेला सारखंच केलं—पण तें जाऊंदे. आतां खरा शहाणपणा कशांत आहे? सुखाला मी पुरा अंतरलों. झालं, लग्नाचं नांव नको यापुढें! क्षणिक सखा, घे, माझा शेवटचा रामराम घे—पण मना, मला सुख मिळालं नाहीं ह्मणून निष्ठुर होऊं नकोस. तिला तरी सुख होईल असं कांहीं करण्याची मला बुद्धि दे. अबला ह्मणजे या जगरूपी भयंकर अरण्यांत वाट चुकलेले प्रवाशी आहेत! त्यांना कुणाचं देखील साह्य नाहीं. तेंव्हां मल्लिकेकरतां मला वाईट वाटणं किती साहजिक आहे? दुर्दैवानीं तिला रात्रंदिवस रडत बसवणं मला कसं सहन होईल? प्रतापराव, तर मग तूंच तिचा स्वीकार कर आणि तिचं न् माझं पण रक्षण कर. आयुष्यांत येणाऱ्या शेंकडों संकटांचं निवारण करून तिला अखंड सुख दे. हें सर्व मजकरतां ह्मणून तरी तूं करच. मला बंदिमुक्त करून तूं माझा प्राण वांचवलास आणि केवळ माझ्याकरतां सर्व शिपायांवर तुटून पडलास हा फक्त तुझं अलौकिक मित्रप्रेम न् मनाचा मोठेपणा यांचाच प्रभाव आहे.

प्रतापराव—मजवर आणि मल्लिकेवर तूं हे उपकार करीत आहेस हा थोडा का मोठेपणा आहे तुझ्या मनाचा? तुझ्या शत्रूंना देखील हें पाहून मान डोलवावी लागेल—पण मला फार वाईट वाटतं तुझी आणखी तिची ताटातूट होणार न?

पिलाजीराव—मुळींच नाहीं. तुझ्या स्वाधीन करतों आहे मी तिला.

प्रतापराव—उगीच बोलायचं ह्मणून मी बोलतोंय् असं समजूं नकोस. मला काय वाटतं आहे माझं मला माहीत. पिलाजीराव, मुकाट्यानीं बसणं, अश्रू गाळणं किंवा प्रेमालिंगन देणं यांतच कांहीं विशेष आहे असं नाहीं. तुझ्या थोरपणाविषयीं एकांतांत बसून काय बोलायचं तें मी बोलेन—पुरे. येतों मी आतां. [ जातो ].

पिलाजीराव—बहाद्दर, त्याच्या मागें जा अगोदर आणि त्याचं मन स्वस्थ होईल असं कर.

बहाद्दर—( मुजरा करून जात असतां ) येथपर्यंत तर ठीक झालं सगळं. आतां लग्न उरकून टाकलं कीं माझ्या मुख्य कामाला झालीच सुरवात! ( जातो ).

पिलाजीराव—व्यर्थ माझी स्तुति आहे ही! तो गेला, आतां मनावरलि दुःखाचं ओझं खालीं उतरण्यास मला फुरसदच मिळाली ह्मणायची! विचारांनो, वाटेल तसे बहका. अश्रू ढाळून मित्रांला दुःख देणं मजकडून कधींही होणार नाहीं. या वेळीं मोठ्या कष्टानीं दाबलेलीं दुःखं जणुं काय ऊर फोडून अगदीं बाहेर येत आहेत आणि आयुष्याचा अंत करताहेत असं वाटतं! एखाद्या रणधुरंधरानीं काळजापर्यंत गेलेला बाण विजयश्रीनीं माळ घालीपर्यंत तसाच ठेवावा आणि मग त्यास उपटून काढून रक्ताचा पूर वाहण्यास मार्ग खुला करावा तद्वतच मी पण माझे हेतु परिपूर्ण होईपर्यंत या असह्य यातनाशरास मोठ्या धै-

यांनीं जागच्या जागीं ठेवीन-होय आणि मग इच्छातृप्ति झाल्यावर तो उपटून प्राणाचा अंत करीन! ( जातो )

अंक २ रा. प्र १ ला.

स्थळ-राजवाड्यांतील एक खोली.

[ बहाद्दर आणि शशिकला येतात. ]

बहाद्दर—केवढा आनंदाचा दिवस हा! लागलं एकदां प्रतापरावचं मल्लिकेशीं लग्न! खरंच, आनंद कसा तो आज सहा वर्षांत मला माहीत नव्हता; पण आज आनंदाला केवढी भरती आली आहे माझ्या! लाडके?

शशिकला-काय हुकूम आहे आपल्या लाडकीला?

बहाद्दर-तुझ्यापुढें उभा राहलों म्हणजे हिऱ्याजवळ कोळसा ठेवल्याप्रमाणें मी दिसतों नाहीं?

शशिकला-मला नाहीं माहीत-उगीच कांहींतरी बोलायचं मेलं! रूपाशीं काय करायचं मला?

बहाद्दर-वः! रूप तर बायकांना अगोदर पाहिजे! आतां तुझ्या बापाचा ऐन झटापटींत मी प्राण वांचवला म्हणून उपकाराचं ऋण फेडण्याकरतां तूं मला माळ घातलीस ती निराळी गोष्ट; पण सरदाराच्या मुलीनीं शिपायाच्या मुलाशीं लग्न लावतांना तूं पाहिलं आहेस का कधीं? तेव्हां तुझ्यासारखीनीं माझ्यावर इतकं प्रेम करणं थोडी का आनंदाची गोष्ट आहे? मी बोलूनचालून आडदांड गडी. प्रेम कसं करावं तें मला माहीत देखील नाहीं-म्हणून म्हणतों, तुला त्याबद्दल वाईट वाटत असेल नाहीं?

शशिकला-पुरे झालं गडे! आपण जवळ असलां म्हणजे किती आनंदांत असतें मी! मग यावरूनच पहा मला काय वाटत असेल तें!

बहाद्दर-मोठाच भाग्यवान् म्हणायचा तर मी? ( तोंडावरून हात फिरवतो. ती लाजते. ) बरं त्या पत्राचं काय केलंस? मी अशी कांहीं युक्ति लढवली कीं त्यामुळें हिम्मतरावनीं पिलाजीरावची अगदीं पुरीच निराशा केली. आतां माझा बहुतेक कार्यभाग अगदीं निर्धास्तपणें तडीला जाईल. झालं तर आटोपलं. पिकलेलं फळ झाडावरून काढायचं इतकंच काय तें राहलं म्हणायचं! जिकडेतिकडे ज्वालाग्रही पदार्थ अगदीं भरून ठेवले आहेत-नुसती सरवत्ती लावण्याची खोटी कीं झालाच मग भडका! लग्न लागतांच तुजपाशीं दिलेलं बनावट पत्र तयार करण्याची मला प्रेरणा झाली. त्यांत पिलाजीरावला कल्पना देखील नाहीं इतकं ओतप्रोत प्रेम मल्लिकेला दाखवलं आहे. स्वतः त्यानीं तिला पत्र लिहलं तरी देखील त्याला इतक्या गोड न् लाडक्या लाडक्या शब्दांची रेलचेल उडवतां येणार नाहीं. माझ्या डोक्यांत घोळत असलेले विचार तडीस जाण्यास ही किती नामी युक्ति काढली आहे पण मी? मग त्याची वाट लावलीस तर तूं?

शशिकला—आज्ञेप्रमाणें तें लागलंच मल्लिकेच्या खोलींत मीं टाकलं.

बहाद्दर—तूं केलेलं काम-मग तें का पाहलं पाहिजे? तें पत्र प्रतापरावच्या हातीं लागलं. मी असा आड उभा राहून पहात होतों तेव्हां त्यानीं तें उचललं. उघडून पाहिलं नाहीं तोंच तो दचकला अन् त्यानीं तें खालीं

टाकलं. त्याच्या मनाला अशी कांहीं जखम झाली ह्मणतेस पण–तो एकदम निस्तेज, प्रेतवत् फिका पडला. दुःखाचे एक दोन सुस्कारे टाकून तो वेड्यासारखा इकडेतिकडे पाहूं लागला. विचार करीत कांहीं वेळ उभा राहून कपाळावर हात फिरवल्यावर त्याला काय वाटलं कुणाला ठाऊक, पुनः तें त्यानीं उचललं. प्रथम तें वाचावं असं त्याच्या मनांत आलं असावं असं दिसतं–तरी पुनः त्याचा बेत फिरला अन् अस्सं चोळामोळा करून त्यानीं तें उराशीं अगदीं गच्च धरून ठेवलं.

शशिकला—पण तें वाचलंच नसलं तर त्यांना काय वाटणार मग? निदान मनाला पुरी जखम होणार नाहीं!

बहाद्दर—मलाही असंच वाटलं प्रथम–पण थोडासा विचार केल्यावर झालेल्या निराशेंत अर्थ नाहीं अशी माझी खात्री झाली. त्यानीं वाचलंच नसलं तर तें वाचून पाहीपर्यंत त्याला अधिकाधिक शंका येतील; कारण ही नेहमींचीच रीत आहे अशी. ही पाहलीस का–ही पिलाजीरावची तसबीर आहे! ही घे आणखी हिची पण व्यवस्था लाव. ही त्याच्या दृष्टीस पडली ह्मणजे तिचं त्याच्यावर प्रेम आहे अशी त्याची खात्री होईल–निदान अजून तो तिच्या मनांत घोळतो आहे अशाला एक सबळ पुरावा आहे असं त्याला वाटेल. तूं किनई तिच्या उशाखालीं किंवा प्रसंगाला सुचेल तिथें तिच्या खोलींत ही टाक. ( देतो ).

शशिकला–असं केल्यामुळं पाप जरी होत असलं माझ्या हातून तरी पतीची आज्ञा ह्मणून मी करीन–बायकांना काय, कुठून तरी नवऱ्यांना सुख द्यायचं! [ जाते. ]

बहाद्दर—कोण–प्रतापराव येतोय्? कसा कावराबावरा झाला आहे पहा! धुमसणाऱ्या अग्नींतून एकदम भडका होऊन ज्वाला निघावी तशी त्याची स्थिति झाली आहे. चवताळलेल्या सिंहाप्रमाणें डोळे वटारून तो बेफाम झाल्यासारखा दिसतोय्. संशयाची नुसती झुळूक लागली नाहीं तर स्वारीची ही दशा झाली आहे–मग जें वादळ मी उत्पन्न करणार आहें त्यांत हा कसा टिकणार! ( प्रतापराव हातांत पत्र घेऊन येतो. )

प्रतापराव–छत्–बिलकुल नाहीं! खूप तुरी दिल्या–पण नाहीं. उगीच मी दोष देतों तिला. ती किती साधी दिसते? इतक्या स्वच्छ मनांत काळेंबेरं–छेः! नांव नको.

बहाद्दर–( एकीकडे ) हं, ठीक चाललंय्!

प्रतापराव–याच्याकडे पाहवत देखील नाहीं मला. नुसती नजर फेंकतांच जर संशय आला अन् माझ्या अंगाचा इतका संताप झाला आहे तर यांत खरोखरच तसा मजकूर आहे असं कळल्यावर काय होईल माझं? नांव नको –पण नाहीं! असेल, असेल कदाचित्! ( बहाद्दरला पाहून दचकतो ).

बहाद्दर–बस, तितकंच धरून बस कीं झालं माझं काम. स्वारीनीं मला पाहलं वाटतं? पण जाण्याचं निमित्य करावं कीं मारलीच हांक त्यानीं!

प्रतापराव–( तो जात असतां ) हं–बहाद्दर थांब.

बहाद्दर—महाराज! काय हुकूम?

प्रतापराव–दारंचिरं गच्च लावून टाक–वाऱ्याला

केवढं भिन्न—

बहाद्दर—[ मध्येंच ] पुरे बुवा महाराज! यांत आपणच आपली निंदा करतां हीं. असंभाव्य कशाला ह्मणायचं? नुसत्या वरवर दिसणाऱ्या गोष्टीवर भरंवसा ठेवायचा यालाच न? मला वाटतं अजून कांहीं आपलं मन शांत झालं नाहीं; आणखी खरं बोलायचं ह्मटलं— ह्मणजे मला त्याबद्दल बिलकुल वाईट वाटत नाहीं. कारण असं भलत्याच गोष्टीला महत्व दिलं ह्मणजे थोडंसं दुःख होणंच रास्त आहे!

प्रतापराव—भलतीच गोष्ट?

बहाद्दर—हें पहा, तर मग मला आपली चूक दाखवलीच पाहिजे आतां. लढाईच्या आदल्या दिवशीं रात्रीं पिलाजीरावला आपण दरबारांत पाठवलं होतं कीं नाहीं? आपल्या अंगाचा संताप करून सोडणारं हें खोटं पत्र ज्यानीं तयार केलं त्या नरपशूला आपलं दुष्ट कृत्य करण्याला कांहीं तरी संधि पाहिजे होती; तेव्हां आपण त्यांना दरबारांत जायला सांगितलं नसतं तर किती बरं झालं असतं?

प्रतापराव—कोणी मीं? मुळींच पाठवलं नाहीं त्याला.

बहाद्दर—नाहीं पाठवलं? हं! इथेंच गोम आहे तर कांहीं. मला वाटलं कांहीं सरकारी कामाकरतां ते दरबारांत गेले! मग लढाईतून आपलं अंग काढायला अन् वचन दिलं असून ते आले नाहींत याचं कारण— कारण, काय कारण असेल बरं? सैन्याबरोबर आपण गेल्यावर ते तिच्याकडे-पण जाऊंद्या. मी फाजील शंका घेत असेन उगीच. तरी पण— मला वाटतं महाराज, फार दिवस प्रिय माणसाची भेट झाली नसली ह्मणजे प्रेमांध लोक—

प्रतापराव (मध्येंच) हो! संतापाच्या भरांत अगदीं विरसलों होतों मी. अगदीं उघड आहे हें. पिलाजीराव मोठा शूर असून कीर्ति ह्मणजे प्राणाहून देखील त्याला अधिक प्रिय—इतकंच नाहीं तर एखादं अवघड काम मुद्दाम अंगावर घ्यायचं जसं स्फुरण येतं त्याला. अतिशय भयंकर काम हातीं घेऊन त्यांत कीर्ति मिळवावी ह्मणून तो अगदीं उतावीळ झालेला असतो. मग पतंगशहाशीं लढण्याकरतां कां आला नाहीं तो? हो असंच—हेंच खरं. तिची भेट घेण्याकरतांच तो राह्यला खास. केवढं हें अमानुष कृत्य? कीर्तीला मुकून एकट्या मित्रावर त्यानीं लढाईचा सर्व भार टाकला तो उगीच नाहीं!

बहाद्दर—असं नाहीं. विनाकारण दोष देतां आपण त्यांना. आपलं प्रेम तिच्यावर होतं हें त्यांना काय माहीत?

प्रतापराव—हो— बरोबर!

बहाद्दर—(एकीकडे) यंव—खूप झोंबल्या मिरच्या!

प्रतापराव—खरंच, त्याच्याशीं विश्वासघात करून मी तिच्यावर प्रेम ठेवलं हें त्याला माहीत नव्हतं खरं! पुराव्यावर पुरावे मिळताहेत—अन् हा शेवटचा तर खूप मजबूत आहे. राजरोस चोरीबद्दल योग्य शिक्षा झाली—अपराधाबद्दल फळं भोगलींच पाहिजेत मला. प्रेम जडलं हा गुन्हा घडला मजकडून—कारण ती त्याची! मित्राचा तिच्यावर हक्क; आणि अरेरे! केवढी दुःखाची गोष्ट? सर्वस्वी माझ्यावर भरंवसा ठेवला त्यानीं. केवढा विश्वासघात केला मी!

बहाद्दर–कसा? त्यांचं फार प्रेम होतं ह्मणतां एकमेकांवर तेव्हां?

प्रतापराव–पिलाजीरावचं जहाज येऊन पोहोंचतांच लग्न लावायचं असा हिम्मतरावचा कायमचा बेत झाला होता.

बहाद्दर—खरं? मग फार दोष नाहीं देतां येत त्यांना. बापाची देखील संमति आहे असं कळल्यावर ते इतके अतुर झाले यांत नवल नाहीं. पुष्कळ दिवस भेट झाली नव्हती; तशांत शिद्याकडील लढाई आटोपतांच आपण पतंगशहावर स्वारी केली तेव्हां लवकर येतां येईलच अशी, कांहीं खात्री नव्हती. ह्मणून–प्रेमाला फाजील ऊत आला एवढंच! आतां असं बरं नाहीं हें खरं; पण मध्यान्ह रात्रीं येतांच, लवकरच लग्न लागणार असं कळणं–मला वाटतं धीर धरणं दुर्घटच जरा अशा वेळीं.

प्रतापराव–दुर्घट?

बहाद्दर–नसेल भरवला धीर सकाळपर्यंत-त्यांत काय आहे?

प्रतापराव–त्यांत काय आहे?

बहाद्दर–पण झालेली गोष्ट परत येते का?

प्रतापराव–अस्सं? भडका करतोयस तूं माझ्या अंगाचा! दुर्घट? झालेली गोष्ट परत येत नाहीं अं? पण भ्रष्ट शय्या–कसं सहन होणार हें? झालं, ठार बुडालों मी! अरेरे! तुला देखील वाटतं न असं? नाहीं ह्मण ह्मणजे अजून देखील बरं वाटेल मला.

बहाद्दर–महाराज, आपल्याला बरं वाटूं नये अशी का माझी इच्छा आहे? पण भ्रष्ट असेल तें पवित्र कसं ह्मणूं मी?

प्रतापराव–खोटी आशा न् दुर्दैव यांनीं पुरा हात दाखवला मला! खोटं–निव्वळ खोटं प्रेम तें! पुरं ढोंग! महा लबाड–त्याच दिवशीं ऊत आला तिच्या प्रेमाला. केवढं अलोट प्रेम दाखवलं! काय सुस्कारे टाकले! आणि हें सगळं ओढनताणून! बरोबर आहे. एक हातांतला जातांच मला पकडलं तिनीं जाळ्यांत!

बहाद्दर–काय ह्मणालांत महाराज, हिम्मतरावचा बेत फिरला त्याच दिवशीं कायतें तिनीं आपल्यावर प्रेम आहे असं दाखवलं. त्यापूर्वी कध्धीं नाहीं ह्मणतां?

प्रतापराव–फक्त एकदां न् हें डुसरून त्यावर कध्धीं नाहीं.

बहाद्दर—अगदीं, अगदीं नाहीं?

प्रतापराव—नाहीं–नाहीं. अगदीं नाहीं! बहाद्दर, कां इतका हळहळतोस तूं माझ्याकरतां? फुकट आहे हें सगळं! तूं पाहिजे तितका यत्न केलास तरी आतां ह्मणून जागा नाहीं आशेला. सफाई फसलों मी!

बहाद्दर–असंच कांहीं ह्मणतां येत नाहीं इतक्यांत. शंकेला थोडंसं बाजूला ठेवून नीट विचार करा. तिच्यावर त्यांचं अतिशय प्रेम असलं तरी त्यानीं आपल्या स्वाधीन तिला केली अन् ती पण अगदीं नाखुषीनीं असंच कांहीं ह्मणतां येत नाहीं.

प्रतापराव–माझ्या स्वाधीन? तिला केली–कोणी केली? पक्का कावेबाजपणा हा! इतके दिवस कसं कळलं नाहीं मला हें? हृदय कसं दुभंग होईलसं वाटतं. प्रथम इतकं प्रेम दाखवायचं न् मग दुसऱ्याच्या स्वाधीन करायची ह्मणजे काय!

बहाद्दर–पण त्यामुळें थोडं का दुःख झालं

त्यांना?

प्रतापराव—कबूल—पण प्राण दे म्हटलं तर देईल का तो माझ्याकरतां? ती त्याच्या मनांतून उतरली हेंच खरं. रुकार देतांना बिलकुल नाखुषी दाखवली नाहीं त्यानीं! उलट आपण होऊन मला भीड घातली. तें चमत्कारिक वाटलं मला--पण आत्तां काय तें खरं कळलं. ती उनाड मैना आहे असं पाहून माझ्या गळ्यांत बांधली तिला!

बहाद्दर—त्यांनीं भीड घातली? खात्री आहे आपली? मग असं असेल तर ते पत्र कशाला धाडतील तिला? ती उनाड आहे असं कळलं तर पुनः कशाला त्यांचं प्रेम बसेल तिच्यावर? मग पत्र बनावटच असलं पाहिजे तर? [ त्यांचा संशय कमी होऊन तो विचार करूं लागतो असं पाहून ] किंवा मला वाटतं—

प्रतापराव—काय वाटतं?

बहाद्दर—मला वाटतं उनाड म्हणून आपल्या गळ्यांत तिला बांधली हें तर खरंच; पण—लोकांच्या वित्तावर परभारें दरोडा घालायला काय हरकत आहे? कोण पाजीपणा हा!

प्रतापराव—शाबास—बरोबर आहे हें.

बहाद्दर—मग—पत्र बनावट नसावं तर?

प्रतापराव—बनावट! धडधडीत पुरावा आहे आणखी काय पाहिजे?

बहाद्दर—न जाणो उगीच संशय येत असेल आपल्याला. आपला तर नाहीं बुवा भरंवसा डोळ्यावर!

प्रतापराव—माझा देखील नसता तर फार बरं होतं. काय? मल्लिका—केवळ देवांगना वाटली ती! पण नको. गोंधळ झाला आहे माझा अगदीं!

बहाद्दर—महाराज, खरं का खोटं, मराव का जगावं असा घोंटाळा झाला म्हणजे विचार करणं बर. अशा या स्थितींत एकदम काय तें ठरवणं धोक्याचं आहे जरा. आपण आपल्या खोलींत जाऊन दोन्ही बाजू नीट तावून तोलून पहा. विशेषतः संशय आला म्हणजे लहानसहान पुरावाल्याला आपण फाजील महत्व देतों—इतकंच नाहीं, तर नुसत्या दोरीला साप म्हणून बडवावंसं वाटतं हें अगदीं विसरूं नका. आणखी, एकदां खात्री झाली म्हणजे मनांत आलेल्या गोष्टीविषयीं चांगला विचार करा. हो, नाहीं तर महत्वाची गोष्ट देखील क्षुल्लक म्हणून सोडतों आपण अशा वेळेस!

प्रतापराव—ती इतकी निर्मळ दिसली कीं प्रत्यक्ष तारा, मंडोदरी पुनः मृत्युलोकांत अवतरल्या आहेत असं वाटलं—पण अरेरे! मल्लिके--

बहाद्दर—( त्याला धरून नेऊं लागतो ) अं हं! महाराज, सध्या चलाच आपण आंत. मग पाहूं काय तें [ त्याला आंत घालवतो. शशिकला येते ].

बहाद्दर—आतांपर्यंत अगदीं सुरळीत चाललं आहे सगळं. मी असं कांहीं अनुपान सुरू केलंय् कीं रोग अधिकाधिक बळावतच जावा. तो नुक्ताच विचार करायला—म्हणजे जास्त जास्त संताप करून घ्यायला गेला आहे.

शशिकला—मी आडच उभी होतें अन् पत्र फाडलं तेव्हां मला अगदीं आश्चर्य वाटलं!

बहाद्दर—हं, तिथेंच तर नामी युक्ति लढवली मी. पत्र फाडल्यानीं माझा हेतु साध्य

झाला इतकंच नाहीं, तर आणखी शंका येण्याला मार्ग झाला. पत्र बनावट आहे, बनावट नाहीं असं करून ती उनाड आहे अशी त्याची खात्री केली न् शेवटीं पत्र तर खोटं नाहीं असंही त्याला भासवलं. पण हो, त्या तजविरीचा लावलास न निकाल?

शशिकला—विचारायला का पाहिजे हें?

बहाद्दर—शाबास—छान केलंस. जा तूं.[ ती जाते ] पण छान—छान कसलं? केवढं कठोर मन माझं? किती लबाड्या न् लाचाड्या या? हें शोभतं का माझ्यासारख्याला शिपायाला? केवढा कीर्तीला डाग हा—पण नको. अशा विचारांत अर्थ नाहीं. हो, सूड—सूड घ्यायचा आहे नाहीं मला? करतोंय् हेंच ठीक आहे तर. असे वेडे वेडे विचार मनांत येणं—छत् ! चला प्रतापरावकडे. ( जातो ).

## अंक ४ था.

—÷*÷—

### प्र. १ ला. प्रतापरावची खोली.

[ बहाद्दर आड उभा आहे. प्रतापराव दृष्टीस पडतो ]

प्रतापराव—अरेरे! केवढा कहर उसळून दिलाय विचारांनीं! छत्—तिलाच बोलावलं पाहिजे. यांतील खरी मख्खी तिच्याजवळून काढल्याशिवाय बरं नाहीं वाटायचं.

बहाद्दर—( पुढें येऊन ) छेः! हें काय महाराज? आपल्याच हातानीं धोंडा मारून घेणं आहे हा पायावर!

प्रतापराव—काय ह्मणतोस?

बहाद्दर—[ एकीकडे ] काय करावं बरं? अशानीं तर सगळंच बिंग बाहेर पडणार!

प्रतापराव—कां, पुटपुट कसली चालली आहे? भिऊं नको. मोकळ्या मनानीं काय तें सांग.

बहाद्दर—तिच्याजवळून काढायचं ह्मणतां? ती कबूल होईल असं वाटतं आपल्याला? केवढा वेडेपणा! आपण पक्कं ध्यानांत ठेवा, हें खरें ठरो अगर खोटं ठरो—पण आपण ठार बुडाल तसं केल तर.

प्रतापराव—ठीक आहे—असं कुजत पडण्यापेक्षां प्राण गेलेला बेहत्तर!

बहाद्दर—पण मग अर्थ काय राहला त्यांत? कबूल—आपल्याला तिनीं स्वतः सांगितलं; पण अधिकच खाणार न तें मनाला?

प्रतापराव—नाहीं—या असह्य वेदनांतून तरी सुटेन. तिरस्कार येऊन ती डोळ्यापुढें नकोशी झाली तरी असा मधल्यामधेंच मी लोंबकळत राहणार नाहीं. प्रेमामुळें दुःख होतंय् त तरी पार नाहींसं होईल.

बहाद्दर—हं—इतकीच माझी खात्री असती तर —

प्रतापराव—[ मध्येंच ] तर? तर काय?

बहाद्दर—तर तें कळावं ह्मणून प्राण द्यायला निघणं कांहीं मर्दाचें काम नाहीं.

प्रतापराव—काय ह्मणतोस? माझ्या अंगाचा संताप झालाय् हें तुला माहीत आहे—तेव्हां हा लपंडाव नको मला. नीट सरळ कां-

हीं सांगायचं असेल तर बोल; नाहींतर हा चाललों मी तिच्याकडे.

बहाद्दर—हो, ह्मणजे मृत्यूकडे! महाराज, मीच चुकी केली. आपण कुणाच्या ताब्यांत सांपडूं नये ह्मणून मी जिवापाड श्रम केले हा मोठ्ठा अपराध घडला खरा मजकडून!

प्रतापराव—गोंधळ उडवतो आहेस तूं माझा!

बहाद्दर—छे:! माझाच उडवतो आहें मी. मला लाज वाटते हें कबूल करायला—पण करतों बुवा कीं माझा देखील बोंटाळा झालाय्! हें पहा स्वतः आपलं आयुष्य धोक्यांत घातल्याशिवाय कांहीं यांतलं खरं कळायचं नाहीं.

प्रतापराव—बोल, बोल लवकर काय तें.

बहाद्दर—इतक्यांत नाहीं; असं कबूल करा अगोदर कीं ती अपराधी ठरली तर आपण आलेला राग अगदीं गिळून टाकाल आणि फक्त प्रेमाला फाटा द्याल.

प्रतापराव—होय—तस्सं करीन; पण बोल.

बहाद्दर—शंकाच आहे मला; पण शपथ घ्या आपण स्वतःचं कांहीं बरंवाईट करणार नाहीं अशी.

प्रतापराव—दहा वेळां घेतों—सांग अगोदर.

बहाद्दर—अगदीं मर्दासारखं सहन कराल?

प्रतापराव—हो, हो—देवासारखं.

बहाद्दर—आपण देवच आहांत माझे. मला किती वाईट वाटतंय् यावरूनच पहा आपण. आपण मजवर अगणित उपकार केले आहेत त्यांचं उसनं फेडायचं ह्मटलं ह्मणजे स्वतःलाच शिक्षा करून घेतली पाहिजे—अर्थात् खरं सांगण्याचं धैर्य केलं पाहिजे. उघडच आहे आपल्याला दुःख ह्मणजे मला शिक्षाच असं मी समजतों. तर मग पिलाजीराव—

प्रतापराव—[ मध्येंच ] अरेरे!

बहाद्दर—सहन नाहीं होत आपल्याला?

प्रतापराव—चालू दे. ऐकतांच जळून खाक होण्यासारखी हकीगत असली तरी मी सर्व न् आत्तां ऐकेन. बोल.

बहाद्दर—पिलाजीराव मध्यरात्रीं—[ मल्लिका येते ]

मल्लिका—( प्रतापरावास ) किती वेळ इकडेच बसायचं हें? मंडळी वाट पहात बसलेत.

प्रतापराव—लाडके, आत्तां येतों मी मागोमाग. आपल्यापैकीं कोणी तरी तिथें पाहिजे—जा तूं.

मल्लिका—पण शब्द असा जडसा येतोय्? शिद्याकडचं कांहीं—

प्रतापराव—( मध्येंच ) छे:! मुळींच नाहीं.

मल्लिका—मग विचार कसला चाललाय् एवढा?

प्रतापराव—दुसरा कसला? तुझ्याच विषयीं सगळं चाललं आहे. तुझ्यावांचून जागाच नाहीं दुसऱ्या गोष्टीला या हृदयांत.

मल्लिका—केवढे उपकार हे मजवर!

प्रतापराव—प्राण आहे तोंपर्यंत तूं मनांत आल्यावांचून एक पळ जाणार नाहीं—बरं जा तूं. [ ती जाते ] वर इतका साधेपणा असून आंत कापट्य असलं तर केवढं दुर्दैव? ही जारिणी ठरली तर आकाशांतील तारांगणाच्या तेजोमयतेवर कोण भरंवसा ठेवील? स्वर्गांतील देवांगना सुद्धां अशाच मानभावी—पण चालू दे. पिलाजीराव मध्यरात्रीं—पुढें?

बहाद्दर—होय. आपण सर्वजण लग्नाचे दु-

सरे दिवशीं संध्याकाळीं आलों. प्रकृति किंचित् नादुरुस्त असल्यामुळें मल्लिका हिम्मतरावकडे राह्यली हें आपल्याला आठवत असेलच-

प्रतापराव-[ मध्येंच ] पण पिलाजीरावचा काय संबंध आहे यांत?

बहाद्दर-सांगतों. धिरानीं घ्या जरा. आपल्या हुकुमावरून सुदैवानीं ह्मणा अगर दुर्दैवानीं ह्मणा आपण मला हिम्मतरावकडे पहाऱ्यावर पाठवलं. खरं न? हं, मग आतां ऐका तर पुढें. पिलाजीराव त्याच दिवशीं मध्यरात्रीं तिकडे आले. ते ह्मणाले आपले कांहीं लखोटे घेऊन मी हिम्मतरावकडे जात आहें-

प्रतापराव-( मध्येंच ) खोटं-निव्वळ खोटं!

बहाद्दर-महाराज, ऐका अगोदर. आपले मित्र; तशांत दरबारी कानं काय वाटेल तेव्हां निघतात-मग मला कसा संशय यावा त्या वेळेस? इतकी लबाडी आंत असेल असं मला बिलकुल वाटलं नाहीं. लग्न लागल्यावर आपल्याशीं इतकी दगलबाजी केली-मग तें तर अगदीं साहजीक आहे.

प्रतापराव—चिंधड्या उडवतों—सगळं सांग. तें-तें काय? माझ्या खजिन्यावर केवढा दरोडा पडला-माझं प्रेम, कीर्ति, मित्रत्व, शौर्य, सगळं तिच्यांत सांठलं होतं. माझा प्राण होती ती-पण सगळा भ्रम ठरला! विचार करूं लागलों कीं नरकयातना झाल्यासारखं दुःख होतं न् विचारच न करावा-पण छेः! तें कसं होणार? कलिजाचं पाणी करणारे ते तेजस्वी डोळे, तिचे गुलाबी गाल, ज्याच्यावर डोकं ठेवलं तर स्वर्गसुखाचा भास होत असे असं तें वक्षस्थल, हीं सर्व डोळ्यांपुढें नकोशीं झालीं आतां! माझं शांतीचं आगर अनीतीच्या भडक्यांत सांपडून त्याची रक्षा झाली किती घोर अपराध! माझा आशावृक्ष एकदम ढांसळून पडला! पण सगळं ऐकूं दे एकदां-तें काय?

बहाद्दर-तें-तें का? पण नाऊंद्या! लग्नाच्या अगोदरचं आहे तें.

प्रतापराव—अगोदरचं? असू दे. त्याचा सगळा कावेबाजपणा कळला पाहिजे. सांग मला.

बहाद्दर-सांगतों बुवा-नशिबीच आलंय् माझ्या मग काय! मला आपली शुभ्र चांदणं पडलेलं असलं ह्मणजे बगीच्यांत जायची संवय आहे. ह्मणून-हो नेहमींप्रमाणें पहारा आटोपतांच मी तें आनंदोद्यान आहे नाहीं, त्यांत गेलों. आंत शिरलों नाहीं तोंच माझ्या आसपास खडबडाट झाल्यासारखं मला वाटलं. तिथें एक लतामंडप आहे तो माहितच असेल आपल्याला-त्यांत एक जोडपं हातांत हात घालून हिंडतांना मीं पाहिलं. चुंबनांचा न् आलिंगनांचा असा कांहीं झपाटा चालला होता ह्मणतां कीं विचारूं नका अगदीं! पुरुष होता तो अगदीं अतुर झाल्यासारखा दिसला. तो अस्वस्थ असून आलिंगनं देतांना एकसारखे सुस्कारे टाकीत होता. पुढें 'केवढी आनंदाची रात्र! पुनः कधीं होईल आपली भेट?' असे शद्ब माझ्या कानीं पडले-आणखी, पाहतों तर पिलाजीराव न् मल्लिका!

प्रतापराव—प्राण जाणार आतां-( धाडकन् कोचावर पडतो ).

बहाद्दर-( एकीकडे ) जाऊं दे ह्मणजे

माझा आत्मा थंड होईल! ( उठवड) हं हं, हें काय महाराज? अरेरे! डोळे फिरवायला लागले अगदीं! महाराज, महाराज मजकडे पहा हो. एक शब्द तरी बोला माझ्याशीं. हा पहा, आपला विश्वासू, लाडका आणि इमानी बहाद्दर आहें मी. उठा—असा धीर सोडून कसं होईल?

प्रतापराव—कोण निर्लज्जपणा हा—

बहाद्दर—( मध्येंच ) महाराज, मर्दासारखं सहन करीन असं ह्मणालांत आपण?

प्रतापराव—मग? सहन नाहीं का करीत-प्राण गेला माझा?

बहाद्दर—पण जरा शांत व्हा—

प्रतापराव—अगदीं वादळासारखा शांत –खात्री ठेव तूं .

बहाद्दर—शहाणे प्रतापराव ते हेच का?

प्रतापराव—राक्षसा नाहीं! त्या लतामंडपांतच अंत झाला त्याचा. प्रतापरावचा खून झाला तिथें! मी भूत आहें त्याचं—अरेरे! बायको, बायको—माझी बायको!

बहाद्दर—( एकीकडे ) खूप चली है! रड, रड लेका.

प्रतापराव—राक्षसा, केवढा अमानुष तूं! किडे पडोत तुला! चोरा, तुला हें ठाऊक होतं तर तूं लग्नच कां करूं दिलंस मला!

बहाद्दर—हें बरोबर आहे—असं विचारा ह्मणजे सांगतों मी. मी त्यांना बगिच्यांत पाह्यलं खरं; पण भावी पतिपत्नींत असं होणं साहजिक आहे असं मला वाटलं. माझ्यासारख्या आडदांड गड्याला बड्या लोकांच्या प्रेमाचे प्रकार काय माहीत? तशांत असे भक्कम पुरावे मिळेपर्यंत मल्लिकेसारखीविषयीं कुणाला शंका येईल? तिच्या सद्गुणांविषयीं शंका घेणं मी तर समजतों मोठं पाप आहे. हल्लीं मिळालेले मजबूत पुरावे फार उशिरानीं आपल्या हातीं लागले—निदान लग्नाचे अगोदर ते कळायला पाहिजे होते. मला वाटतं आपल्याकडूनच थोडीशी घाई झाली. आतां तेवढ्यांतल्या तेवढ्यांत घाई करून आपल्याला हा प्रकार मला कळवतां आला असता हें खरं—पण चोरून कशाला ठेवूं उगीच! माझं मन आहे जरा कोंवळं-तेव्हां खरंच बुवा आपल्याला कांहीं धीर झाला नाहीं ती गोष्ट काढायला. केवळ अज्ञानामुळें आणि त्या गोष्टीचं खरं महत्व न कळल्यामुळें चुक झाली. पाहिजे तर आपल्या सुखाकरतां ही घ्या—गर्दन छाटून घ्यायला देखील तयारी आहे माझी.

प्रतापराव—नाहीं—तुझी फार गरज आहे मला आतां. हं ' आनंदाची रात्र ' नाहीं? हेच शब्द किनई? चेंदामेंदा करतों आतां. कसं बरं? हो—तें, तें ठिकाण बरं दूर न् एकीकडे आहे. जा, तिथें वाट पहा माझी. ( तो जाऊं लागतो ) आणखी कट्यार घे बरोबर तुझी. ( जातो ) ते शब्द अजून गुणगुणतायत कानांत! ' पुनः कधीं भेट होईल ' अं? आज रात्रीं —नरकांत समजला? तें पत्र, हे भक्कम पुरावे न् ही तजवीर यांनीं बालंबाल खात्री झाली आतां. या गोऱ्यागोमट्या दिवट्या उत्पन्नच झाल्या नसत्या तर केवढा अनाचार टळला असता ? या हरिणीचं रूप धारण करणाऱ्या राक्षसीनीं पातिव्रत्याचा नायनाट केला. लग्ना-

च्या वेळीं घेतलेल्या आणाशपथांस हरताळ लावून निष्कलंक प्रेमाला तिनीं जहर बनवलं. अरेरे! या सुंदर सटवाईनीं खऱ्या कुलशील स्त्रियांला लाज आणून सद्गुण ह्मणजे निव्वळ ढोंग ठरवलं. [ मल्लिका येते ] छे:! पण इला पाह्यलं कीं दिपून जातों मी!

मल्लिका—हें असं काय मेलं? ही दुसरून आलें मी. सगळे वाट पहात बसलेत न तिकडे. आपल्याशिवाय मजा नाहीं वाटत मंडळींना.

प्रतापराव—हा आलोंच मी—पण आपण असल्यावर मजेला काय कमी आहे? ( सुस्कारा टाकतो. )

मल्लिका—अगबाई! सुस्कारा कां टाकला?

प्रतापराव—छे:! मुळींच नाहीं.

मल्लिका—मला आपलं वाटलं तसं. आपलं तेंच माझं दुःख नाहीं का?

प्रतापराव—कां, फारशी साखरपेरणी चालली आहे?

मल्लिका—खरं प्रेम दाखवणं न् मोकळ्या मनानीं बोलणं यालाच साखरपेरणी ह्मणायची असली तर ह्मणावी बापडी; पण आजचा आनंदोत्सव—

प्रतापराव—( मध्येंच ) कसला आनंदोत्सव?

मल्लिका—थट्टा तरी मेली किती करायची?

प्रतापराव—खरंच, मला आपली थट्टाच करावीशी वाटते. आनंदानीं ऊर अगदीं भरून आलाय!

मल्लिका—खरंच, मला देखील तसंच झालंय. आनंदी स्वभाव न् सद्गुण हीं केवढीं भूषणं आहेत बायकांना?

प्रतापराव—सद्गुण? आग ला—

मल्लिका—काय ह्मटलं आपण?

प्रतापराव—नाहीं, ह्मटलं तूं फार सुंदर आहेस.

मल्लिका—नुसतं सौंदर्याला काय करायचं? मन शुद्ध असेल तर त्याची शोभा. सुंदर असून निष्पाप असेल तीच खरी बायको.

प्रतापराव—( एकीकडे ) निष्पाप अं?

मल्लिका—काय, कांहीं बोलायचं होतं वाटतं आपल्याला?

प्रतापराव—छे:! लाडके, तं नेहमीं जवळ असावीशी वाटतेस. ( हात धरून ) हा हात, खरंच किती लुसलुशीत आहे तरी? फार मऊ, पण कट्यारीहून भयंकर ! [ अश्रु येतात ]

मल्लिका—मऊ न् कट्यारीहून भयंकर—अरे देवा! पण अश्रुधारा—

प्रतापराव—आणखी काय दर्शक असणार आनंदाचं? एकसारखं तुझ्याकडे पहात राह्यलं तर भूकतहान पार नाहींशी होते—पण अन्नाशिवाय राह्यलं तर प्राण जायचा!

मल्लिका—ह्मणजे असं काय हें बोलायचं आज? हेंच का माझ्यावर आपलं प्रेम? आपले डोळे असे गरगर कां फिरतायत? आपण तोंड काय ह्मणून फिरवतां असं वरच्यावर? अगबाई! कांहीं तरी झालंय खास. [ मीठी मारते ] बोला हो बोला माझ्याशीं. नाहीं न बोलत? ( घेरी येऊन पडूं लागते ]

प्रतापराव—[ तिला सांवरून ] हं हं, हें काय?

मल्लिका—मी मोठी लाडकी होतें न? मग असं कसं झालं हें? माझा आपल्याला असा त्रास कां यायला लागला? माझा इतका कंटाळा यायला काय चूक झाली मजकडून?

प्रतापराव—( तिला नीट उभी करून ) खोलींत जा तूं आपल्या . मी येतोंच मागोमाग. तुला कीं नाहीं भलतीच शंका आली आहे उगीच. जरा पड ह्मणजे बरं वाटेल तुला. जा.

मल्लिका—मर्जी–येतें. ( जाते. बहाद्दर आड येऊन उभा राहतो ]

प्रतापराव—काय–निष्पाप नाहीं दिसत ती? इतकं कोंवळं मन काळंबेरं असूं शकेल? तो एक हरामखोर असला ह्मणून ही–छेः! त्या सुंदर शरीरांत कट्यार भोसकून रक्तपात करायचा? मुळींच नाहीं. बिलकुल व्हायचं नाहीं आपल्याकडून. माझा अपराध आहे खास. मग? मग काय, पण–नांव नको; ठरलंच तें.

बहाद्दर—[ प्रतापरावकडे पाहून ] स्वारीचं मन फिरलं वाटतं! ती तर मेलीच पाहिजे. याच्या हृदयांत असलेल्या सर्पाला चिथवून पुनः याच्या अंगाचा भडका नाहीं करतां येणार मला?

प्रतापराव—ही अवाढव्य पृथ्वी, हा तेजोमय सूर्यनारायण, हें अफाट आकाश या सगळ्यांना अंत आहे मग माणसाची काय कथा? यत्किंचित् कीटकाहून कीटक–त्याला कसा अंत नसेल? दिवसानीं थोडंसं साम्राज्य केलं नाहीं तोंच रात्र त्याला पार नाहींशी करते–असे महिनेच्या महिने न् वर्षंच्या वर्षं नाहींशीं होतात. जग– जग ह्मणजे एक जन्ममृत्यूची मालिकाच आहे. मग मरणाला भिण्यांत काय अर्थ आहे? जगांत राह्यलाच भिणं बरं ! हें जग एक घोर अरण्य आहे. सगळा एकांतवास भरला आहे यांत! यांतून गेलेल्या लोकांचीच संख्या जास्त—हो, तेव्हां त्यांच्याच भेटीला जावं ह्मणजे मग कांहीं एकलकोंड्यासारखं वाटणार नाहीं. मृत्यु कोणाला सोडतोय्? राजा न रंक, सगळ्यांवर त्याचा अम्मल आहे तेव्हां तो सर्वांत श्रेष्ठ झाला हें उघड आहे. मग अशाच्याच आश्रयाला कां जाऊन राहूं नये?

बहाद्दर—(पुढें येऊन)महाराज,मला वाटतं –मरणाविषयीं विचार चाललेत कांहीं?

प्रतापराव—बरं मग?

बहाद्दर—मग ह्मटलं, मल्लिका मेली वाटतं?

प्रतापराव—नाहीं–माझाच अपराध आहे मूळ. त्याचं तिच्यावर इतकं निस्सीम प्रेम होतं हें माहित असून देखील मी तिच्याशीं लग्न लावलं हा केवढा मूर्खपणा!

बहाद्दर—बोलण्याचा रोख–ध्यानांत नाहीं आला माझ्या?

प्रतापराव—अबलेचा रक्तपात करणं ह्मणजे माझी कट्यार विटाळवणं आहे. आजपर्यंत मिळवलेल्या कीर्तीला कलंक लावणं आहे; तरी पण—स्वतःवर राग काढायला कांहीं हरकत नाहीं. दूरवर विचार न करतां आपला अपराध असून देखील दुसऱ्याला मारणं हें संकुचित मनाच्या लोकांचं काम आहे. मोठ्या मनाच्या लोकांनीं स्वतःलाच मारणं उत्तम नाहीं?

बहाद्दर—दुर्दैव ह्मणायचं–दुसरं काय? महाराज, हा मनाचा मोठेपणा नसून तिच्या सौंदर्यानीं घातलेली भुरळ आहे ही; आणि ह्मणूनच आपण स्वतःवर हात टाकायला तयार झाले आहांत! तिच्या ज्या सुकुमार वक्ष-स्थलांत नुसता आनंदी--आनंद भरला आहे त्याचं विदारण करणं आपल्याकडून होत नाहीं यांत नवल नाहीं. मग हें पहा, माझं ऐका तर. या चटक चांदण्यांवर दुष्ट लोक फार टपलेले असतात; तेव्हां ती सुंदर आणि निष्पाप मूर्ति पिलाजीरावकरतां—नाहीं चुकलों, आपल्याकरतां नीट जतन करून ठेवा. अलीकडे या छानछबेल्या मैनांना पिंजऱ्यांतून उडून जावसं फार वाटतं—तर नीट संभाळा, नाहीं तर हातावर तुरी देऊन जाईल एखादी!

प्रतापराव—अरेरे! काळजाला घेरे पाडतो आहेस अगदीं! नको नको–बहाद्दर, दया कर माझ्यावर. मी पुष्कळ धीर करून पाहिला, दगडासारखं कठोर मन व्हावं ह्मणून जान जान पछाडली; पण तिच्यावर नाहीं वाहवत माझा हात! तिच्या डोळ्यांतून येणारे प्रेमबाण मला अगदीं गर्भगळित करून टाकतात.

बहाद्दर—काय बोलावं मला कळत देखील नाहीं—माझी मति अगदीं गुंग होऊन गेली आहे. पुरुष ह्मणजे--पुरुषच ते. आपण जाणारच तर हें जग सोडून? मग हीच आपली शेवटची भेट ह्मणायची? माझे देखील डोळे मिटले असते तर किती बरं होतं? ह्मणजे तें तरी टळलं असतं माझ्या नशिबाचं!

प्रतापराव-काय ह्मटलं?

बहाद्दर–काय फुटक्या नशिबाचा आहे मी पहा—अजून नाहींच न कळलं आपल्याला? माझं आपल्यावर किती प्रेम आहे याची आपल्याला कल्पना देखील नसेल; नाहीं तर आपल्या मागें—छेः! माझं हृदय फुटून जाईल अगदीं! केवळ अन्यायानीं जे आपल्या जिवावर उठले आहेत त्यांनीं आपल्यामागें वाटेल तशा मनसोक्त मौजा माराव्यात हा ईश्वराचा मोठाच न्यायीपणा समजला पाहिजे! आपण जिवंत असतांना डोकं वर करायची देखील ज्यांची छाती नाहीं असे हलकट न् पाजी लोक विषयवासनेनीं अंध होऊन वाटेल तसा गोंधळ घालतील तो आपल्या या इमानी आणि जिवलग पण दुर्दैवी दोस्ताला पहावा लागणार अं? आपल्यासारख्या शूर आणि सच्छील राजाची अर्धांगी एका हरामखोराला कडकडून मिठ्या मारील तें पाहण्यापेक्षां देवा, मला अंधळं करून टाक!

प्रतापराव—कोण भ्रष्टाकार हा! पण पिलाजीराव तिला विसरल्यासारखा दिसतो?

बहाद्दर–होय–कामवासनेला पुरा ऊत येईपर्यंत तो विसरल्यासारखंच दाखवील; आणि तसं त्यानीं दाखवलं नाहीं तर आपल्यासारखे भोळे लोक फसतील कसे? महाराज, लतामंडपांत दिलेलं शेवटचं चुंबन किंवा लग्नानंतर घेतलेली भेट हीं तो विसरला नाहीं हें आपण खूप ध्यानांत ठेवा. तो सध्यां कांहीं दाखवीत नाहीं खरं; पण आपल्यामागें त्या पोंवळ्यासारख्या ओंठावर दंतव्रण उठव-

ण्याकरतां विजेसारखा धांवून येईल हें पसंत आहे का आपल्याला? मग तो सुस्कारे टाकील, अश्रु ढाळील पण आपल्याकरतां दुःखानीं नाहीं हो! मनांत असेल नसेल तें ओकून, आयत्याच फुललेल्या, टवटवीत आणि मधानीं भरलेल्या पुष्पाचा यथेच्छ उपभोग घेणं हीच आपली उत्तरक्रिया–पण जाऊंद्या! परमेश्वरा, तो चुंबनांचा सपाटा, त्यांच्या आनंदाला येणारा ऊत आणि तीं आलिंगनं पाहण्याचं महाराजांच्या नशिबीं न ठेवतां माझ्याच वांट्याला ठेवतोस याबद्दल मी फार आभारी आहे तुझा. आपण तरी सुखांत रहाल. त्यांपैकीं आपल्याला कांहीं दिसायचं नाहीं कीं ऐकू यायचं नाहीं हेंच माझं मोठं भाग्य समजतों मी–हो, नवऱ्याचीच प्रत्यक्ष बायकोला वाटेल तसं वागायला परवानगी असली तर माझ्यासारख्या परक्याला नशिबावर हवाला ठेवल्यावांचून आणि येईल त्या स्थितींत समाधान मानल्यावांचून दुसरी काय तोड आहे?

प्रतापराव–थांबा, शिरांनो तुटून जाऊं नका. चेंदामेंदा केल्याशिवाय तोड नाहीं दुसरी, पण छेः! इतक्या अमोल रत्नाला नाहींसं करायचं? बहाद्दर, तुझं दुःख टळावं ह्मणून मी एक युक्ति काढली आहे. एकदम गांठून पिलाजीरावलाच नाहींसं कर. प्रतापरावचा हुकूम आहे हा समजलास?

बहाद्दर—आपला हुकूम पाळलाच पाहिजे मला!

प्रतापराव–मग मला मरायला हरकत नाहीं तर आतां?

बहाद्दर—संभाळा महाराज, पुन्हा पुन्हा विचार करा. एक पिलाजीराव मेला ह्मणून सगळं जग ओसाड पडणार नाहीं. कामाचा सपाटा आपल्याला माहित नाहीं कसा असतो तो. विकार अनिवार होऊन विनयाला एकदां रजा मिळाली ह्मणजे बायकांना भेटेल तो पिलाजीराव दिसतो!

प्रतापराव—हें फार भयंकर तर! एक, दुसरा, तिसरा असे लाखों विचार गोंधळ उडवून देत आहेत. बस्स, निरुपाय आहे माझा. वांचलंच पाहिजे मला. नाहीं, नाहीं मरायचं. झाला निश्चय.

बहाद्दर—आपल्याला मरायचं नाहीं न् तिला पण मारायची नाहीं मग राह्यलं काय? इतकंच उरलंय बुवा कीं मागलं सगळं विसरावं आणि पुनः पूर्ववत् प्रेम ठेवावं!

प्रतापराव—अरेरे!

बहाद्दर–जगानीं चांगलं न् शहाणं ह्मणावं अशी हांव सुटली असेल तर पातिव्रत्याला रसातळीं बुडवणाऱ्या बायकांना क्षमा करावी हा आपला उत्तम मार्ग! खरंच महाराज, लोक आपल्याला फार फार दयाळू समजतील असं केलं तर!

प्रतापराव—समजलों मी. ती झालीच पाहिजे नाहींशी. कट्यार भोसकतांना हात थरथर कांपला तरी ठार झालीच पाहिजे ती.

बहाद्दर—हं, ही खरी मर्दुमकी. मोठमोठ्या देशांचा विजयदुंदुभी ऐकूं येतो याचं कारण काय? केवळ सत्यपथस्वीकार. मन कठोर करून फक्त खरी बाजू घ्यावी ह्मणून खऱ्या शूर लोकांनीं प्रेम, मनाचा कोंवळेपणा आणि फाजील दयलुत्व या सगळ्यांना गुंडाकून ठेवलं पाहिजे. अमर देशांत एकानीं प्रत्यक्ष आपल्या मुलीची आहुति दिली आणि त्यांनीं जितक्या ह्मणून लढाया मारल्या त्यांत मिळालेल्या कीर्तीपेक्षां या धैर्याबद्दल त्याची जास्त स्तुति झाली. दुसऱ्या एकानें खरा पक्ष न सोडण्याच्या निश्चयानीं आपल्या जन्मदात्रीला मारली आणि तिसऱ्यानीं तर निवळ नीतीकरतां पोटच्या पोराचं डोकं स्वतः उडवलं. इतकंच नाहीं तर महाराज, कांहीं वीरमातेचे असेही पुत्र निपजले कीं त्यांनीं स्वतःचे प्राण देखील दिले; तरी आपली लाडकी —पण प्राणाहून देखील प्यार अशी अर्धांगी मारून मनाचा खरा मोठेपणा दाखवणारा एक देखील मर्द मी पाहिला नाहीं. तेव्हां आतां त्या सर्वांवर आपण ताण करा ह्मणजे आपली जयपताका यावच्चंद्रदिवाकरौ फडफडत राहील.

प्रतापराव—बस्स, ठरलं तें. तुझं ह्मणणं पुनः खरं वाटायला लागलं मला. जगांतील अनाचार टाळण्याकरतां मनाला कठोरता आणलीच पाहिजे. हो, मी अगदींच विसरलों होतों. आजच वर्ष झालं लग्न होऊन तेव्हां हाच मुहूर्त छान आहे. संताप, सूड, निराशा आणि मृत्यु इत्यादि दोस्तांनो, चला त्या लतामंडपांत हजर असा. मला साह्य करून खरं वीर्य माझ्यांत आणा ह्मणजे तिच्या जारकर्माचा आजच्या आज शेवट करून नरकांत फेंकतों तिला! [ जातात. ]

### अंक ५ वा.

प्रवेश १ ला. ( बहाद्दर आणि प्रतापराव येतात. )

प्रतापराव—काय, मेला कीं नाहीं पिलाजीराव?

बहाद्दर—आपला हुकूम मी कसा अमान्य करीन? सहा मारेकरी पाठवले होते! बोलून चालून शूरच ते. चारजणांना तर त्यांनीं जमिनदोस्त केलं; पण शेंवटीं शेंकडों जखमा लागून ते पडलेच. प्राण जातांना त्यांनीं आपलं स्मरण केलं आणि आपल्याला सदैव सुख व्हावं ह्मणून ईश्वराजवळ करुणा भाकली!

प्रतापराव—किती प्रेम हें माझ्यावर—पण जाऊं दे. सध्यां प्रत्येक गोष्टीनीं अमावस्येसारखं भयंकर रूप धारण केलं आहे. दुर्दैवानीं इतकं कांहीं अक्राळविक्राळ स्वरूप घेतलं आहे कीं जिथें जिथें ह्मणून पंचमहाभूतांचा संचार आहे अशा प्रत्येक ठिकाणीं प्रलयकालासारखा गोंधळ उडून गेला आहे. बोल, बोल लवकर मल्लिका कुठें आहे ती. आतां कठोरपणाशिवाय कांहीं उरलं नाहीं या ह्रदयांत—आणि यापेक्षां देखील मी भयंकर होईन. हो, पण मी जो तिच्याशीं वर्तणूक केली त्याबद्दल तूं कशी समजूत पाडलीस तिची?

बहाद्दर—विशेष कांहीं वाटलं तर लहानपणापासूनच आपला असा कांहीं स्वभाव आहे कीं आपण लागलेच अस्वस्थ होतां; पण

ते मनोविकार क्षणिक असतात असं सांगून मी तिच्या मनांतली शंका अगदीं काढून टाकली. पुढें हळू हळू मोठ्या शिताफीनें पिलाजीरावच्या मरणाची हकीगत तिला कळवली —पण ते कसे मेले हें कळूं नये ह्मणून मी पुरी खबरदारी घेतली. त्यांचा अंत झाला हा केवळ त्यांचाच दोष होता असं सांगितलं तेव्हां तिनीं पुष्कळ वांकडेतिकडे प्रश्न केले; तरी मी कसला वस्ताद? मी तिची बिनतोड खात्री केली. बरं, पण आपण काय करणार आतां? कसा काय बेत झाला आपला ?

प्रतापराव—तेंच सांगतों. ज्या लतामंडपांत स्त्रीधर्माला कलंक लावून ती अनीतीच्या अतळस्पर्श खातांत बुडाली, पातिव्रत्याचं निर्मूलन करून निर्लज्जतेच्या अत्युच्च शिखरावर जाऊन बसली आणि प्रेमांध होऊन मला हें जग निःसार करून सोडलं तिथें तिची गांठ घेतों. त्या ठिकाणीं यावं ह्मणून अगोदरच सांगून ठेवलं आहे तिला. शांतपणा कसा धरावा तें शिकलों मी आतां. तिचा अपराध तिच्या पदरांत घालून केवळ मानवजातीच्या सुखाकरतां अगदीं गंभीरपणानीं तिचा शेवट करतों. ( जातो )

बहादूर—जा, चालतो हो! सूर्यतनया, आपला पाश घेऊन तयार रहा. संतापादि विकारांनो, तिथें नृत्यगायन करीत बसा. तेथील पुष्पांचा सुगंध नाहींसा होऊन जिकडेतिकडे हलाहल विषाचा अम्मल बसो. सर्प नाग इत्यादि प्राण्यांच्या फूत्कारांनीं सर्व वातावरण दूषित झालं ह्मणजे मला फार आनंद होईल. [ जातो ]

प्रवेश २ रा. [ लतामंडपांत मल्लिका निजली आहे. प्रतापराव येतो.]

प्रतापराव—मी इथें आलों तरी देखील शांत आहे जिकडे तिकडे? माझा स्पर्श होतांच धरणीकंप कसा होत नाहीं? माझ्या दोस्ताला विषयांध बनवून एका तरुणीला नीतिभ्रष्ट करणाऱ्या लतामंडपा, संभाळ. तुझ्या आंत मारेकरी शिरला आहे. (मल्लिकेकडे पाहून) काय, झोंप लागली आहे इला? मग नेत्रांनो, आपलं पारणं फेडून घ्या. देवा, काय प्रसंग आणलास हा ? केवढं भयंकर सौंदर्य हें? नुसतं पाह्यलं तर कोण जारिणी ह्मणेल इला? निर्दय ब्रह्मया, इतकी सुंदर मूर्ति बनवून शेवटीं माणसाकडून तिचा शेवट करायचा अं? अरे ? हंसली वाटतं. मी कधीं हंसणार नाहीं—तरी पण एक शेवटचं चुंबन घ्यावं नाहीं? ( जात असतां दचकून मागें येतो ) काय, पुनः हंसली? हं, बरोबर. जाराचीं स्वप्नं पडताहेत तिला ! आग लागो तुझ्या सौंदर्याला! आत्तां पार नाहींसं करतों तें. ( मारायला जातो तोंच धक्का लागून ती जागी होते ).

मल्लिका—किती उशीर वाट पाहत होतें मी? शेवटीं ती मजा पहातां पहातां झोंप देखील लागली मला.

प्रतापराव—( एकीकडे ) मना , संभाळ—बदलूं नकोस. गोड गोड बोलून काय सावरून घेते पण ! यापूर्वींच ठार केली असती तर किती बरं होतं?

मल्लिका—आपल्याशींच काय बोलणं चाललंय् ?

प्रतापराव—नाहीं मी ह्मणत होतों प्रेमाला अंत नसता तर देव माणसं बनलीं असतीं—पण त्याच्या नादीं लागून कितीजण दुष्कर्म करायला तयार होतात! असो, सगळ्यांनाच मरायचं आहे एकदां नाहीं?

मल्लिका—ह्मणजे! मरणाचं काय ह्मणतां आपण? हो, समजलें. खरंच, आपले मित्र आपल्याला टाकून गेले; पण "मजकडे" पहा आपण ह्मणजे बरं वाटेल जरा. माझं प्रेम—

प्रतापराव—( मध्येंच ) तुझ्याकडे पाहूं! डांकिणी—नाहीं, चुकलों ; देवांगने, सदैव तुझ्याकडे पहावंसं वाटतं. प्रेम, कुठून आलं प्रेम तुझ्यांत? तुझ्या प्रेमांत अशी कांहीं शक्ति आहे कीं, मनोदधींत वादळ होऊन डोकं भणाणून जातं अगदीं. या तुझ्या डोळ्यांत तेज आहे तें कुठून चोरून आणलंस तूं? स्वर्गांतून? हो, तिथूनच. त्याला एका क्षणांत नाहींसं केलं असतं—पण जाऊंदे. जातों मी. [ जात असतां कट्यार पडते ]

मल्लिका—( कट्यार उचलून ) अगबाई! कट्यार! [ बहाद्दर येतो ]

बहाद्दर—किडे पडोत आपल्यावर कट्यार उचलणाऱ्या हाताला! ( एकीकडे ) पण ही कट्यार सांपडली—आतां एक एक शंका निघणार. काय करावं बरं? हरकत नाहीं. असंच करूं या.

मल्लिका—मी अगदीं घाबरून गेलें आहें भीतीनीं! निघून जातांना तुझ्या महाराजांच्या हातून ही कट्यार पडली—याचा अर्थ तरी काय? माझा गोंधळ झालाय्! अशी काय झाली त्यांची स्थिति! देवा, त्यांचं रक्षण कर.

बहाद्दर—आपलं, आपलं बाईसाहेब.

मल्लिका—बहाद्दर, काय—ह्मणतोस तरी काय तूं?

बहाद्दर—बाईसाहेब, आपल्या अमर्याद चांगुलपणानीं आपल्याला इतकी अंधळी केली आहे कीं त्यांना आपला संशय आला आहे हें देखील आपल्याला कळत नाहीं!

मल्लिका—अरे देवा! आतां कळालं मला सगळं. ते अलीकडे असं कां करतायत तें आलं माझ्या लक्षांत. संशय! माझी छाती धडधड उडायला लागली. निर्दय, निर्दय—अगदीं निर्दय बरं हे पुरुष! केवढा अपमान? कांहीं तरी पुरावा? कसाई ग बाई निव्वळ कसाई! इतक्या सद्गुणी पुरुषाला देखील संशयानीं घेरावं न? सगळं हें असं संशयावरून चाललंय् अं इतके दिवस? देवा, माझे तरी डोळे मीट. त्यांनीं कांहीं केलं तरी ते धनी आहेत माझे. मी सदैव प्रेम करीन त्यांच्यावर. सरलं माझं आयुष्य—पण नाहीं. त्यांच्या तोंडानीं एकदां ऐकलंच पाहिजे. असा कलंक लावून घेण्यापेक्षां ही कट्यार भोसकून घेणं सहस्रपट बरं! ( जाते )

बहाद्दर—हेंच ठीक चाललं आहे. खऱ्या पतिव्रतेला असा अपमान कधीं सहन व्हायचा नाहीं. जिवावर उदार झालेल्या बायका एका सद्गुणाकरतां काय करतील न् काय नाहीं याचा नेम नाहीं. संतापानीं ती अगदीं वेडी झाली आहे. तें इतकं कांहीं तिच्या काळजाला झोंबलं आहे कीं आतां ती त्याला कमजास्त बोलेल. तो अधिक अधिक खवळून त्याला जास्त जास्त संशय येईल. को-

णत्याही बाजूनीं का लाट उसळेना–आपलं काम फत्ते आतां [ प्रतापराव येतो ] महाराज—

प्रतापराव—( मध्येंच ) एक शब्द देखील काढूं नकोस! मी भागुबाई नाहीं; पण कोणी तरी मला अडथळा केला खास. यक्षकिन्नर ह्मण अगर कोणी माणूस ह्मण—त्यानीं मला मागें ढकललं. असो, पुनः येईल प्रसंग तेव्हां पाहूं.

बहाद्दर—महाराज, ती जारिणी–

प्रतापराव—[ मध्येंच ] उरफाट्या काळजाच्या राक्षसा, आग लागो तुझ्या तोंडाला. तिला पाहिलं कीं मी गर्भगळित होतों. ही शरमेची गोष्ट असेल कदाचित्—पण चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत माझं प्रेम तिला मारली तरी कायम राहील तिच्यावर. निरुपाय आहे माझा. कांहीं तरी अमानुष शक्ति आड येते हेंच खरं. इतका यत्न केला तरी कट्यार चालेना–पण थांब, चालता हो इथून! माझी लाडकी आली वाटतं. जा, जा निघ. काळं कर आपलं तोंड. [ तो जातो. मल्लिका येते ] किती वेळ इच्याकडे पाहिलं तरी तृप्ति ह्मणून होत नाहीं. तुझा मला संशय आला तरी तूं पुनः बुचकळ्यांत पाडतेस मला. काळजाला भोंक पडतायत माझ्या!

मल्लिका–[ रडत ] कोण, मी का पाडतें महाराज?

प्रतापराव—काय, रडतेस तूं ?

मल्लिका—उगीच का रडतें मी?

प्रतापराव—प्रेम हेंच कारण असेल तर फुकट आहे हा अश्रुपात. देवाला देखील माझ्यासारखं प्रेम करतां येणार नाहीं. बस्स, माझा प्राण आहेस तूं. ( मिठी मारून ) हें आलिंगन नेहमीं असंच राहो!

मल्लिका–हीं डोळ्यांतलीं टिपंच दाखवतील मला किती आनंद झाला आहे तो. आपण आलिंगन दिल्यावर मला कसली भीति उरणार मग? आपल्यावरच माझं सगळं सुख. ( कट्यार दाखवून ) उगीच मला भिवडलं या मेलीनीं.

प्रतापराव–( मिठी सोडून ) अं? माझी कट्यार ही! तिला पाहिलं कीं थरथराट होतो सगळा. आण–आण इकडे ती. प्रेमाविषयींच बोलत बसूं आपण.

मल्लिका–कां, पाहवत नाहीं ती आपल्याला?

प्रतापराव–प्रेमाविषयीं बोलूं ह्मटलं न मी?

मल्लिका–काय, मृत्यूविषयीं!

प्रतापराव—खरं सुख पाहिजे असेल–

मल्लिका [ मध्येंच ] तर खून करायचा होय?

प्रतापराव–काय, चालता होऊं मी इथून?

मल्लिका—नाहीं, आपण उगीच माझ्या काळजाला भोंकं पाडलींत तीं काय ह्मणून?

प्रतापराव–अजून जाऊं दे मला–संताप झालाय माझा!

मल्लिका–कुणाचा होणं रास्त आहे? साऱ्या जन्मांत असं कांहीं तरी घडलं आहे का माझ्या हातून? मग संशय कां आला माझा आपल्याला? काळंबेरं कां आलं असं आपल्या मनांत? सगळे पुरुष सारखे–मोठे संशयी! असा संशय आलाय तर पुरा निकाल

लावा त्याचा. माझ्या पदरांत माझी चुक घाला; नाहीं तर असा डाग लावून घेण्यापेक्षां मरण पुरवलं!

प्रतापराव—पुरुषांच्या नांवानीं खडे फोडण्याचा धंदाच आहे तुमचा! ज्या दुःखाचा विसर पडावा ह्मणून मी शिकस्त केली त्याचं तूं पुनः कां स्मरण देतेस मला? पण तूं भडका केलास माझ्या अंगाचा तेव्हां शहानिशा झालीच पाहिजे खऱ्याखोट्याची. बोल, कबूल हो, खरं सांग काय तें ( तजबीर दाखवून ) कुठें सांपडली ही मला?

मल्लिका—पिलाजीराव हे! पण महाराज, आपल्याहून फार शांत होते ते.

प्रतापराव—होय; पण त्याची माझ्या तोंडावर तूं स्तुति करतेस इतका दुर्गुण बोकाळला आहे का जगांत? ही पहा, भूमि दुभंग होऊं लागली, भ्रष्टाकार डोळे वटारून पाहूं लागला—जगाला कंटाळा आला तुझा!

मल्लिका—मग माझ्या हातून पाप घडलं ह्मणतां आपण?

प्रतापराव—हो हो, लाखों वेळा हो ह्मणेन!

मल्लिका—देवा, तुला डोळे आहेत. महाराज, जारिणी ह्मणून घेण्यापेक्षां—ही पहा येतें मी [ कट्यार मारून घेऊन पडते ]

प्रतापराव—[ तिचा हात धरण्याकरतां केलेला यत्न व्यर्थ गेला हें पाहून ] बहाद्दर, शशिकले, धांवा धांवा. रक्तपात झाला ! यक्षकिन्नर हो, इचं रक्षण करा.

मल्लिका—आत्मघात करणं निंद्य आहे; पण आपले डोळे याशिवाय उघडले नसते. आतां खुशाल मला पापी ह्मणा. ( शशिकला येऊन तिच्या हातांतील कट्यार घेते )

प्रतापराव—जा. इला तावडतोब उपचार करा. ईश्वरकृपेनीं आराम पडो तुला.

मल्लिका—( शशिकला नेत असतां ) शशिकले थांब. शेवटचे दोन शब्द मला बोलूंदे. दुर्दैवी राजा, आतां कां कांपतोस असा? अशी टक लावून आतां काय होणार? पण आपली अशी स्थिति होणंच साहजिक आहे—मी मरतें ह्मणून नाहीं; तर आपल्या अविचारामुळें. काय केलंत हें? कुणावर आळ घेतलात आपण! मल्लिकेवर? तिच्याविषयीं एकदां संशय आल्यावर आपण तिला कधींही जिवत ठेवली नसतीत. प्रत्यक्ष नवऱ्यानीं जारिणी ह्मटल्यावर निर्लज्जासारखं जिवंत राहण्यापेक्षां प्राण देऊन पतिव्रता ठरलेलं बरं. खरंखोटं करीत बसेल ती पापी असेल असं कदाचित् जगाला वाटण्याचा संभव आहे ह्मणून त्या भानगडींत मी पडलें नाहीं. पुरे, जातें मी [ शशिकला तिला घेऊन जाते. ]

प्रतापराव—काय, ही जारिणी असेल? अन् नसली तर—मग केवढा अविचारी ह्मणायचा मी! एकतर ती जारिणी ठरली पाहिजे अगर मी मेलों पाहिजे. कुठें आहे—बहाद्दर कुठें आहे? प्रतापराव, नरकाशिवाय दुसरी गति नाहीं तुला! ( जातो. बहाद्दर येतो. )

बहाद्दर—कसं काय? पुरा सूड उगवला कीं नाहीं मी? हें छान झालं; पण एक गरीब बिचारी—हरकत नाहीं तरी पण ! एकदोघे प्राणाला मुकले नाहींत तर सूड कसला मग? ( शशिकला येते )

शशिकला—( थरथर कांपत ) हें पहा,

मजकडे पहा हो जरा. अजून नाहीं का आपली तृप्ति झाली? बिचारी मल्लिका—

बहाद्दर—[ मध्येंच ] मरत आहे हेंच सांगणार कीं नाहीं तूं? सगळे मरणार आतां—जा, निघ.

शशिकला—महाराज अगदीं वेडे झाले आहेत. दुःखाच्या भरांत तीन वेळां त्यांनीं स्वतःवर हात टाकला; पण शेवटीं त्यांचं शस्त्र हिसकून घेतलं. ते आपल्याला शोधीत आहेत.

बहाद्दर—बस्स, चालती हो. सर्वांचा स्वाहा करतों मी! निघ, निघ; तोंड दाखवूं नको मला. ( तिला धक्का मारून घालवीत असतां ) गेलं तुझं सौभाग्य आज [ तिला घालवतो. प्रतापराव येतो. ]

प्रतापराव—घात झाला माझा!

बहाद्दर—ह्मणजे! नीट सांगा काय तें.

प्रतापराव—सर्वस्वी बुडालों—मला नाहीं बोलवत. ( त्याच्या खांद्यावर डोकें देऊन ) कुणाचा तरी गैरसमज आहे यांत.

बहाद्दर—उगीच वाटतं हें आपल्याला.

प्रतापराव—(डोकें उचलून) निरर्थक दुःख आहे हें ह्मणतोस?

बहाद्दर—अजून तर कांहीं कारण दिसत नाहीं मला. दुःख पुढेंच आहे.

प्रतापराव—तुला भ्रम झाला तर मग!

बहाद्दर—आपण डोळ्यांत सलतां—

प्रतापराव—कोणाच्या?

बहाद्दर—तें कळण्यांत काय अर्थ आहे?

प्रतापराव—पुष्कळ!

बहाद्दर—खरं!

प्रतापराव—अगदीं खरं. सांग त्याचं नांव.

बहाद्दर—आपली गुलामगिरी करण्याकरतां देवानीं मला जन्म दिला नाहीं? तर मग ऐका—मी तो!

प्रतापराव—तू? मी झोंपेंत आहें कीं जागा!

बहाद्दर—अगदीं जागे. मल्लिका निष्पाप आहे—यांतच मला मोठा आनंद आहे. पिलाजीराव अगदीं निरापराधी—मी बनावट पत्र तयार केलं. तजवीर खोलींत टाकवली ती मी. तुमचा द्वेष करणारा, तिरस्कार करणारा आणि नाश करणारा पण मीच!

प्रतापराव—मांग—मांग आहेस तर तूं निव्वळ! [ पडतो ]

बहाद्दर—जशाला तसं आहे हें समजलां? मांग—मांग आहे मी नाहीं? [ त्याचे छातीवर पाय ठेवून ] सूड घेण्यास प्रवृत्त करणाऱ्या विकारांनो, झालं माझं काम. सौरदेशांतील लोकांनो, जा—रडत बसा. अमरदेश काबीज करणाऱ्या नराधमाची ही दशा पाहून तुमचं दैव फुटलं ह्मणून समजा. माझ्या प्रिय देशबंधूंनो, तुमची हाल अपेष्टा करणाऱ्या या सौर देशाधिपतीला कस्पटासमान मानून त्याच्या छातीवर मी नृत्य करीत आहें तें पाहून आनंद माना. प्रतापराव, ऊठ. शिद्यांनीं तुझ्या शहराला गराडा घातला. तुझं राज्य लुटून त्यांनीं फस्त केलं.

प्रतापराव—मानवी राक्षसा—

बहाद्दर—( मध्येंच ) सौर देशावर छत्र धरणाऱ्या मारेकऱ्या, तुझ्या फाजील थोरपणानीं तुला फसवलं. तूं मला पुरं ओळखलं नसलंस तर अजून डोळे उघड. कोण आहें

मी? लढाईंत कैद केलेला एक शिद्दी गुलाम नाहीं ! खरोखरच गुलाम असेन तर मला तसं करणारा नरकांत पडो. सहा वर्षं दास्यत्वांत काढलीं तर राजपुत्राचा गुलाम बनतो अं? शिद्यांचा पराक्रमी राजा अबदुल्ला तुझ्या या नष्ट हातांनीं वार करून मारला गेला त्यावेळीं त्याच्याजवळ मोठ्या नेकीनीं लढणारा बहाद्दर गुलाम नसून त्याच्या गादीचा मालक होता. शत्रूच्या दृष्टीस राजपुत्र पडूं नये म्हणून समरांगणांत त्यांनीं मला निराश्या वेषानें आणलं होतं. ( प्रतापराव उठतो ) काय, हें ऐकून तुला पुनः स्फुरण चढलं ! बापाच्या प्रेतापाशीं असतांना तूं मला कैद केलंस. त्याच्याकरतां एक अश्रु ढाळण्यास देखील तुझ्या लोकांनीं मला फुरसुद दिली नाहीं. सहा वर्षं ताबेदारी केल्याचा मोबदला मला काय मिळाला माहित आहे तुला? तेहतीस कोटी देव साक्ष आहेत—तुझ्यासारख्या मर्त्यांनीं मजवर हात टाकला!

प्रतापराव—( अंगावर धांवून त्याचा गळा धरतो ) सर्प, सैतान, वेताळ—

बहाद्दर—[ कट्यार काढून ] हं, खबरदार—संभाळ .( प्रतापराव मागें सरतो )

प्रतापराव—पाषाणा, तुला इतक्या ममतेनीं वागवलं त्याचा हा मोबदला? माझा मित्र व्यर्थ मारला गेला. निष्पाप मल्लिका विनाकारण मरत आहे. दोघांना मी मारलं—केवढा मूर्ख! नरकाशिवाय गति नाहीं आतां. तुला हाल हाल करून—

बहाद्दर—( मध्येंच ) मारण्यापूर्वी प्रत्यक्ष तुला देखील कबूल केलं पाहिजे कीं मी केलं तेंच रास्त आहे. माझ्या जन्मदात्याला मारून केवळ एका मित्राकरतां तूं माझ्या देशबांधवांच्या अंगांतून रक्ताचे पूर काढलेस. माझं राज्य रसातळाला नेलंस. राजाच्या पोटीं येऊन मला काय राहलं मग? गादीऐवजीं सूड, संपत्तीबद्दल तुझे हालहाल! आतां तुझा सूड घेतांना मल्लिकेसारखा अमुल्य हिरा फुटून दुभंग झाला म्हणून लोक मला दोष देतील; पण तुला माझ्या मनाप्रमाणें जिवंतपणीं खऱ्या नरकयातना ती निष्पाप मेल्यावांचून झाल्या नसत्या. तशांत तूं मेल्यावर तिला जगून काय करायचं आहे? बस्स, आतां माझी पुरी तृप्ति झाली. मरायला तुला भीति वाटत असली तर कसं मरावं तें मी दाखवतों. ( तो कट्यार मारून घेत असतां प्रतापराव त्याची कट्यार घेतो. )

प्रतापराव—नाहीं, नुसतं मरून सुटका नाहीं होणार तुझी. ( त्याच्या मांडीवर कट्यार मारून ) जखमच झाली पाहिजे अगोदर. [ हिम्मतराव, चाकर लोक वगैरे येऊन बहाद्दरास कैद करतात. ] कोण मामासाहेब?

हिम्मतराव—अरेरे! प्रतापराव, काय अनर्थ हा? मल्लिकेचं दुःख सहन न झाल्यामुळें शशिकलेनीं सर्व हकीगत सांगितली आणि पश्चात्ताप होऊन तिनीं जीव दिला!

बहाद्दर—ठीक झालं—सुटली बिचारी!

प्रतापराव—[ आंत रडारड ऐकून ] काय रडारड? कसली ! [ हैबतराव येऊन हिम्मतरावच्या कानाशीं लागतो ] काय बातमी आहे?

बहाद्दर—मी सांगतों—मल्लिकेचा अंत झाला!

हिम्मतराव—[ [illegible] ] खर आहे!

प्रतापराव—[illegible] कायः ( पुनः बहाद्दरा-ला जखम करून ) या चोराला जिवंत जाळा.

बहाद्दर—त्यांत काय आहे? शस्त्र भोसक-ले तरी एक निवणाऱ्या अग्नींत टाकलें तर भाजून मरण्यापलीकडे काय होणार? पण तु-ला पुरा हात—

हिम्मतराव—[ मध्येंच ] तोंड .आटोप बेरडा !

बहाद्दर—ख्यातारबुवा, जिवंत आहें तोंपर्यंत मी असा बोलणार . माझी खात्री आहे कीं सध्यांच कांहीं आपण मला मारीत नाहीं.

प्रतापराव—तो पहा—तो पहा माझा मित्र पिलाजीराव! काय, मला बोलावतोस? हा पहा आलोंच मी. [ उरांत कट्यार मारून घेतो. [illegible] काढतात ] राजपुत्रा, ( खा-लीं पडतो ) तूं पुरा सूड घेतलास. मल्लिके— ( प्राण जातो )

बहाद्दर—[ कैद करणारांस ] ए चोरांनो, दम धरा. मी तुमचाच आहें आतां; पण प्र-तापरावला पाहूं द्या मला. ( प्रताजवळ जाऊन) कां महाराज, कुठें आहे आपलं वैभव? याच हातांनीं मला मारलं नाहीं? तूं मेलास त्या अ-र्थीं माझा द्वेष पण गेला आतां. तूं मनाचा थोर खरा; पण फाजील भोळसर? तुझी तीच माझी वाट आहे. ते पहा यमदूत मला नरकांत नेण्याकरतां येत आहेत—

हिम्मतराव—[ मध्येंच ] चला, ओढा हरा-मखोराला. ( नेऊं लागतात. पडदा पडतो. )



